# अनुक्रमणिका

# लेखकासंबंधी थोडेसे

या अमर कृती 'इस्लाम, ज्यावर माझे प्रेम आहे'चे लेखक वेंकटचलम अडियार आहेत. त्यांचा जन्म १९३५ मध्ये तामिळनाडूच्या कोइम्बतूर जिल्ह्यातील तिरयूर शहरात झाला. त्यांचे इंटरपर्यंत शिक्षण झाले. शाळा आणि कॉलेज जीवनात त्यांना साहित्यिक कार्यक्रमांची खूप आवड होती. ते कॉलेजच्या तामिळ साहित्य विभागाचे सचिव होते.

अडियार साहेबांनी अनेक नाटके लिहिली आहेत आणि त्यांचे लेख (संवाद) विशेष पसंत केले गेले. ते तामिळनाडूचे एक खंदे वक्ते आहेत. अडियार यांनी भूदान आंदोलनात विनोबा भावे यांच्यासमवेत भाग घेतला होता आणि त्या कार्यात भाग घेत राहिले. या आंदोलनाचे मुखपत्र 'ग्रामदान'चेसुद्धा ते संपादक होते. ते तामिळनाडूच्या प्रसिद्ध दैनिक 'तनरल' व 'मुरसौली' या वर्तमानपत्रांचे वार्ताहर आणि सहसंपादकसुद्धा होते. आणीबाणीच्या काळात अटक झालेल्या लोकांत तेसुद्धा सामील होते आणि या संबंधाने त्यांना अनेक अडचणी व कष्ट सोसावे लागले.

बालपणापासूनच मुस्लिम विद्यार्थी त्यांचे सोबती होते. त्यांच्या शिक्षकांपैकी अनेकजण मुस्लिम होते. मद्रासच्या पत्रकारितेशी संबंधित जीवनात आणि राजनैतिक कार्यातसुद्धा अनेक मुस्लिम लोक त्यांचे मित्र व सोबती होते. त्यामुळे त्यांना मुस्लिमांच्या धर्माबद्दल व त्यांच्या श्रद्धेविषयी बरीचशी माहिती सहजगत्या प्राप्त झाली. यानंतर ते स्वत:देखील इस्लामच्या अभ्यासाकडे आकृष्ट झाले आणि त्यांनी इस्लामचा चांगलाच अभ्यास केला.

आणीबाणीच्या काळात जेव्हा त्यांना मिसाखाली अटक केली गेली आणि ते दीड वर्षांपर्यंत नजरकैदेत राहिले. तेव्हा त्यांना इस्लामचा अभ्यास करण्याची एक नामी संधी मिळाली. या संधीचा लाभ घेऊन त्यांनी इस्लामचा गाढ अभ्यास केला. त्यांच्या सुटकेनंतर त्यांनी 'इस्लाम, ज्यावर माझे प्रेम आहे' नावाची एक निरंतर लेखमाला आपल्या वर्तमानपत्रात सुरु केली.

'संपूर्ण जग निकट भविष्यकाळात प्रत्यक्षपणे अथवा परोक्ष रूपाने इस्लामचा स्वीकार करील.' हा अडियार साहेबांचा दृढविश्वास आहे.

**- नसीम गाजी फलाही**

“अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे”

# उत्तम आदर्श

इस्लाम धर्माला मी फारच आदर व सन्मानाच्या दृष्टीने पाहतो. म्हणून यासंबंधीचे माझे विचार मी लिखित रूपाने प्रस्तुत करीत आहे. वाचकवर्ग यांचा लक्षपूर्वक अभ्यास करतील अशी मला आशा आहे. हल्ली सामान्यपणे धर्मसंस्थापकांना रूढिवादी म्हटले जाते. परंतु या संस्थापकांच्या जीवनचरित्राचा अभ्यास केल्यानंतर मी या निर्णयाप्रत पोचलो आहे की, हे सर्व महान पुरुष आपापल्या युगातील चुकीच्या रीती-रिवाजांच्या विरूद्ध आवाज उठविणारे महान क्रांतिकारी नेते होते.

हिंदू धर्म अथवा वैदिक धर्मात सुधारणा करणारे शंकराचार्यसुद्धा एक क्रांतिकारी व्यक्ती होते. वेदाचा एक अर्थ दृष्टीपासून दूर ठेवणे अथवा लपविण्याचासुद्धा आहे. वेदाचा हा अर्थ मानणाऱ्या जगात ‘वेद सर्वांसाठी आहेत’ची घोषणा करणारे रामानुजमसुद्धा एक क्रांतिकारी होते.

आदरणीय ईसा मसीह (अ.) (येशू ख्रिस्त) सुद्धा आपल्या युगातील चुकीच्या रीती-रिवाजाविरुद्ध आवाज उठविणारे क्रांतिकारी व्यक्ती होते. अशा प्रकारे जर आम्ही धर्मांच्या इतिहासाचा अभ्यास केला तर आम्हाला दिसेल की त्यांचे महान पुरुष रूढिवादी नव्हे तर क्रांतिकारीच होते.

मला ही गोष्ट स्पष्टपणे सांगण्यात कोणताही संकोच वाटत नाही की या क्रांतिकारी लोकांत सर्वांत महान पैगंबर मुहम्मद (स.) आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याशिवाय अन्य सर्व व्यक्तींनी कोणाच्या न कोणाच्या सान्निध्यात राहून ज्ञान व विवेकाची प्राप्ती केली आहे. त्याशिवाय त्यांच्या शिक्षण-प्रशिक्षणात त्यांच्या आई-वडील अथवा त्यांच्या कुटुंबाचे योगदान राहिलेले आहे. परंतु आम्ही पाहतो की, पैगंबर मुहम्मद (स.) यांची परिस्थिती या सर्वांपेक्षा अगदीच भिन्न आहे. त्यांच्या जन्मापूर्वीच त्यांचे आदरणीय पिता अब्दुल्लाह यांचे निधन झाले होते. ज्या लोकांनी आपल्या वडिलांचे तोंड पाहिलेले नाही, त्यांनाच पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या वडिलांची उणीव आणि अडचणींची खरी कल्पना चांगल्याप्रकारे येऊ शकते.

या उणिवा अद्याप संपल्याच नव्हत्या की पैगंबर मुहम्मद (स.) सहा वर्षांचेच असताना त्यांच्या प्रेमळ आईची सावलीदेखील त्यांच्या शिरावरून नाहीशी झाली. घटना अशी घडली की, पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या प्रेमळ आई व उम्मे ऐमन यांच्यासमवेत

यसरिब (मदीना शहर) कडे, जेथे त्यांच्या वडिलांची कबर होती, जात होते की, मार्गातच त्यांच्या आईचे निधन झाले. वडिलांचे तोंड पाहावयास मिळाले नाही आणि लहान वयातच प्रवासात आईच्या वियोगामुळे दु:खाचा डोंगर त्यांच्यावर कोसळला. या अनाथ मुलाला आश्रय देण्यासाठी आजोबा (वडिलांचे वडील) अब्दुल मुत्तालिब पुढे सरसावले. परंतु अद्याप दोन वर्षेसुद्धा लोटली नव्हती की त्यांचेही देहावसान झाले.

वडील, मग आई आणि आजोबांच्या स्नेहापासून वंचित! आणि ही सर्व दु:खे केवळ वयाच्या आठव्या वर्षांच्या आत! आता पैगंबर मुहम्मद (स.) पूर्णपणे निराधार झाले होते. मानवजगताला अल्लाहच्या कृपेने संपन्न करणारे पैगंबर मुहम्मद (स.) निराश्रित एकाकी उभे असलेले दिसत होते.

अशा बिकट परिस्थितीत त्यांचे चुलते अबू तालिब यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना आधार दिला. परंतु आईवडिलांच्या गैरहजेरीत एखाद्या व्यक्तीच्या कष्टाची कल्पना केवळ तेच लोक करू शकतात जे आपल्या आईवडिलांच्या सावलीपासून वंचित राहिलेले आहेत.

अशा प्रकारे एका विपत्तीग्रस्त अनाथाच्या हस्ते इस्लामसारखी महान संपत्ती जगाला मिळाली. कशा प्रकारे या अनाथाचा संदेश स्पेनपासून चीनपर्यंत जगाच्या या कोपऱ्यापासून त्या कोपऱ्यापर्यंत पोचला, हे एक आश्चर्यजनक सत्य आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे निर्दोष व सर्व प्रकारच्या दुराचारापासून मुक्त जीवनच इतक्या प्रचंड प्रमाणावर इस्लामच्या प्रसाराचे मूळ कारण आहे. हे सांगणे अगदी योग्यच आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांचे महान व्यक्तित्व मानवतेसाठी उत्तम आदर्श आहे.

# मजुरीवर जनावरे चारणारा बादशहा

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवन बाल्यावस्थेपासून शेवटपर्यंत एक उत्तम आदर्श आहे. कित्येक पुढारी आणि कित्येक धार्मिक नेते असे आहेत, ज्यांचे प्रारंभिक जीवन चुकीच्या मार्गावर भटकलेले दिसते. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवन वयात आल्यापासून शेवटपर्यंत अगदी स्वच्छ व दिव्य आहे. त्याच्यात कोणताही डाग किंवा दोष दिसत नाही.

त्यांचे चुलते अबू तालिब त्यांचे संरक्षक होते. अबू तालिब यांची आर्थिक स्थिती चांगली नव्हती, म्हणून त्यांचे आर्थिक ओझे कमी करण्यासाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मजुरीवर जनावरे चारण्याचेसुद्धा काम केले.

- माझे पैगंबर मुहम्मद (स.)
- संपूर्ण जगाला सरळमार्ग दाखविण्यासाठी अल्लाहकडून पाठविलेले मार्गदर्शक!
- अरबस्तानवासीयांना ज्ञान, विवेक आणि समंजसपणाच्या संपत्तीने संपन्न करणारे!
- रोमन साम्राजाच्या प्रचंड शक्तीला पराभूत करणारे स्वामी!
- ज्ञान, कर्म आणि जगाच्या सर्वच खजिन्यापासून इस्लामच्या अनुयायींना संपन्न करणारा महान नेता!
- राजांचे नेता.

बालवयात मजुरीवर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी गुरेसुद्धा चारली. किती संकटे आणि अडचणींना त्यांना तोंड द्यावे लागले याच्या कल्पनेनेच आमचे डोळे पाणावतात. या उत्तम सद्गुणांचे स्वामी असलेल्या व्यक्तीचे नेतृत्व मुस्लिमांना प्राप्त आहे. नि:संशय मुस्लिम हेवा करण्यास पात्र व भाग्यवान आहेत.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी शेळ्यासुद्धा चारल्या. आपल्या चुलत्यांसमवेत बारा वर्षांच्या लहान वयात व्यापाराच्या उद्देशाने स्वदेशापासून दूरवरचा प्रवाससुद्धा केला. ते आपल्या कुटुंबीयांच्या मालाबरोबरच वृद्ध व असहाय महिलांचासुद्धा माल घेऊन गेले जेणेकरून त्यांनादेखील काही प्राप्ती व्हावी.

पैगंबर मुहम्मद (स.) असहाय व निर्बलांचा नेहमी विचार करीत असत,

''मी बाजाराला निघालो आहे, आपल्याला एखाद्या वस्तूची गरज असेल तर ती मी आणू का?''

असे निवेदन आपल्या शेजारच्या असहाय लोकांसमोर स्वत:पुढे होऊन ते करीत असत. अशाच प्रकारे निराश्रित व पीडित लोकांच्या मदतीसाठी 'हिलफुलफजूल' नामक एक समिती तयार झाली, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनीसुद्धा त्यात भाग घेतला आणि त्यात भरपूर सहयोग दिला. पैगंबरांचे जीवन खरेपणाचा नमुना आहे. त्यांनी कधीही वचनभंग केले नाही.

एकदा असे घडले की, एक गृहस्थ असे सांगून गेले की, ''आपण येथेच थांबा, मी इतक्यात येतो.''

पैगंबर मुहम्मद (स.) त्या जागीच थांबले. एक दिवस नव्हे, दोन दिवस नव्हे, तब्बल तीन दिवस ते तेथे थांबले.

जे गृहस्थ त्यांना असे सांगून गेले होते त्यांच्या डोक्यातून ही गोष्ट निघून गेली होती की, त्यांनी पैगंबरांना तेथे थांबण्यास सांगितले होते. तिसऱ्या दिवशी संयोगाने ते तिकडून निघाले तेव्हा त्यांनी पैगंबरांना तेथे पाहिले. लज्जित होऊन त्यांनी विचारले, ''अद्याप तुम्ही येथेच उभे आहात काय?''

अल्लाहच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी कोणत्याही प्रकारची नाराजी न दाखविता अत्यंत नरमाईने उत्तर दिले, ''आपणच तर मला येथे थांबावयास सांगितले होते.''

अशाच महान सद्गुणामुळे लोक त्यांना 'अमीन' (अमनातदार) व 'सादिक' (सत्यवचनी) म्हणून बोलावीत असत.

अशा उच्च कोटीच्या गुणांनी सुसज्जित माणसाला माननीय खदीजा (रजि.) यांनी आपला जीवनसाथी म्हणून निवडले. वास्तविकत: हे माननीय खदीजा (रजि.) यांचे सौभाग्य होते. यापूर्वी माननीय खदीजा (रजि.) दोन वेळा विधवा झाल्या होत्या. त्या पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यापेक्षा पंधरा वर्षांनी वयाने मोठ्या होत्या. 'ताहिरा' (सत्शील) म्हणून त्यांचे उपनाव होते.

माननीय खदीजा (रजि.) यांच्यापासून कासिम, अब्दुल्लाह, जैनब, रुकय्या, उम्मे कुलसूम, फातिमा वगैरे अनेक मुले पैगंबरांची झाली. कासिम आणि अब्दुल्लाह यांचे निधन बालवयातच झाले. माननीय खदीजा (रजि.) यांच्याशी विवाह झाल्यानंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांना थोडीशी आर्थिक निश्चितता प्राप्त झाली. तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) एकाग्रचित्त होऊन मानवतेच्या सुधारणेसंबंधी विचार करू लागले.

कौटुंबिक कर्तव्ये पुरी करून दीन (धर्म) कडे बोलविण्याची व दीनला प्रभावी बनविण्याची जबाबदारी पूर्ण करण्याचे उदाहरण आम्हाला केवळ याच पैगंबरांच्या जीवनात

आढळते.

- गौतम बुद्धांनी संन्यास घेतला होता.
- शंकराचार्यांनी विवाह केला नव्हता.
- आदरणीय मसीह (येशू ख्रिस्त) अविवाहित होते.
- बहुतेक धर्मांचे गुरु ब्रह्मचारी, अविवाहित व सन्याशीच आढळतात.

परंतु पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या घरातील जबाबदाऱ्याही पूर्ण करताना आढळतात व धर्माच्या स्थापनेतील सर्व प्रकारचे ओझेसुद्धा आपल्या खांद्यावर उचलताना दिसतात. केवळ एकच धर्मपत्नी नव्हे तर अनेक पत्नींच्या जबाबदारीचे ओझेसुद्धा त्यांच्यावर होते. अशा अनेक जबाबदाऱ्यांचे ओझे असूनदेखील पैगंबर मुहम्मद (स.) यांचे गृहस्थ जीवनसुद्धा एक आदर्श जीवन आहे आणि सामाजिक जीवनसुद्धा एक आदर्श!

लोकांनी त्यांना 'अल्-अमीन' (अमानतदार) आणि अस्सादिक (खरा) म्हणून संबोधिले; परंतु जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांना धर्माकडे बोलाविले तेव्हा हेच लोक त्यांचे कठोर विरोधक झाले.

धर्मांच्या इतिहासात कित्येक क्रांतिकारींनी लोकांना आमंत्रित केले, परंतु कोणाचाही इतका घोर विरोध केला गेला नाही, जितका पैगंबर मुहम्मद (स.) यांचा केला गेला. पैगंबरांच्या संदेशात अखेर कोणती गोष्ट होती की ज्यामुळे इतका घोर विरोध केला गेला?

# 'निराकार'ची उपासना

जगातील कोणत्याही क्रांतिकारीने ती गोष्ट सांगितली नाही जी गोष्ट पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितली. उपासनेसाठी प्रतिमा, मूर्ती, चित्र कोणतीही गोष्ट असू नये. हे शिक्षण त्यांनी चौदाशे वर्षांपूर्वी दिले. प्रतिमा आणि चित्र असू नयेत, हे सांगितले तर जाऊ शकते, परंतु यापुढे एक पाऊल जाऊन पैगंबरांनी मूर्ती फोडल्या व चित्रे नष्ट केली. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी केवळ उपदेशच दिला नाही तर त्याची अंमलबजावणीसुद्धा करून दाखविली.

येथे तामिळनाडूत आम्ही ई.व्ही.आर. यांना एक महान क्रांतिकारी व्यक्ती मानतो. ते अशासाठी की त्यांनी मूर्तीपूजेची केवळ निंदाच केली नाही तर प्रत्यक्षपणे मूर्तीसुद्धा फोडल्या. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांनी शेकडो वर्षांपूर्वी हे कार्य केले होते. दिव्य कुरआनची आयत ''सत्य आले, असत्य मिटले, असत्य मिटण्यासाठीच असते.'' याचे पठन करीत काबागृहात ठेवलेल्या मूर्ती पैगंबरांनी हटविल्या.

मुस्लिमांचा सर्वांत मोठा सण 'ईदुल अजहा' आहे. हा सण कोणाच्या स्मरणार्थ साजरा होतो आणि त्याने काय केले होते? आदरणीय इब्राहीम (अ.) आपल्या आज्ञाधारक पुत्र इस्माईल (अ.) यांना अल्लाहच्या मार्गात बळी देण्यासाठी पुढे आले. याच घटनेची आठवण म्हणून हा सण साजरा केला जातो. होय! या पूर्वजांचे चित्रसुद्धा काबामध्ये ठेवलेले होते.

सण साजरा करण्याची आज्ञा तर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दिली व अशा प्रकारे या मान्यवर पूर्वजांच्या प्रतिष्ठेला कायमचे जीवित केले, परंतु मूर्तींबरोबरच त्यांच्या चित्रांनासुद्धा त्यांनी काबागृहातून हटविले. याच्यापेक्षा अधिक एखाद्या क्रांतिकारी कार्याची कल्पना केली जाऊ शकते काय?

त्याशिवाय ही महत्त्वाची कार्यवाही कोणत्या देशात केली गेली? त्या देशात केली गेली जेथे अज्ञान व मूर्तीपूजा लोकांच्या अंगात पूर्णपणे भिनलेली होती.

रशियात साम्यवादी शासन आहे. ते ईश्वराचा इन्कार करतात, परंतु तेथे देवी-देवतांच्या मूर्ती नष्ट करणे अथवा त्यांना हटविण्याचे धाडस कोणातसुद्धा नाही. येथे तामिळनाडूत काही क्रांतिकारी कवींनी हे गीत गायिले की, ''ती सकाळ केव्हा उजाडेल जेव्हा येथील मूर्ती फोडल्या जातील,'' परंतु येथील गल्लोगल्लीत आजदेखील आम्हाला मूर्ती आढळतात. परंतु चौदाशे वर्षांपूर्वी काबागृहातून मूर्ती हटविल्या गेल्या. हे मानवी इतिहासातील अत्यंत साहसपूर्ण व क्रांतिकारी पाऊल होते.

आपल्याच देशात आपल्याच पूर्वजांनी पुजलेल्या मूर्ती हटविणे व मिटविणे असामान्य धैर्याचे काम आहे आणि अशी क्रांतिकारी कामगिरी मानव-इतिहासात केवळ पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याच हाताने पार पडली. आज मनुष्य प्रगतिवादाचे मोठमोठे दावे करतो. ईश्वराचा इन्कार करण्याला व नास्तिकतेला आपल्या प्रगतिवादाचे प्रमाण म्हणून प्रस्तुत करतो, परंतु तो मूर्ती व चित्रांच्या प्रेमात आजसुद्धा गुरफटलेला आहे.

ही काय विडंबना आहे की, हे प्रगतिवादी लोक ईश्वराचा तर इन्कार करतात आणि यापुढे जाऊन देवी-देवतांच्या मूर्तींनासुद्धा व्यर्थ म्हणतात. परंतु ते स्वत: आपल्या नेत्यांचे पुतळे बनवितात आणि त्यांच्यासमोर नतमस्तक होतात.

ते देवतांचे चित्र हटवितात, परंतु त्यांच्या जागी आपले फोटो लावतात. प्रतिमा असोत की फोटो दोन्ही माणसाच्या निर्बलतेचे प्रतीक होत. या निर्बलतेपासून सावध करणारे व यापासून माणसाचा बचाव करणारे पैगंबर मुहम्मद (स.) आहेत आणि त्यांनी हे महान कार्य चौदाशे वर्षांपूर्वी करून दाखविले.

हल्ली प्रतिमा व मूर्ती आणि चित्रांचा आधार घेतल्याशिवाय केवळ ज्ञान व धारणांच्या आधारे जर जीवनाचे एखादे आंदोलन चालत असेल तर ते इस्लामी आंदोलन होय.

काही लोक म्हणतात की, जर प्रतिमा व चित्र बनविण्याचे बंद केल्यास मानवाची सौंदर्यअभिरुची संपुष्टात येईल, परंतु या गोष्टीपासून मुक्त व स्वच्छ मुस्लिमांनी जगाला एकापेक्षा एक सुंदर इमारतींची देणगी दिली आहे.

कल्पनेला चित्र व प्रतिमांच्या बंधनातून मुक्ती दिल्यानंतर मुस्लिमांनी ज्या कामगिऱ्या केल्या त्यांचे विवरण असे आहे-

१) गणितशास्त्रात वर्तमान अंकाची रचना केली गेली.

२) बीजगणित अस्तित्वात आले आणि त्याचा विकास झाला.

३) निर्माण कलेत अत्यंत सुंदर इमारती व मस्जिदींची निर्मिती केली.

४) रसायनशास्त्रात सिल्व्हर नायट्रेट व सल्फ्युरिक ॲसिडचा शोध लावला.

५) (अ) अल फाराबी यांचा ग्रंथ 'शल्य-चिकित्सा'.

(ब) इब्ने सीना यांचा 'अल-कानून'.

(क) अली इब्ने अब्बासी यांच्या 'किताबुल मालिकी'सारख्या मौलिक ग्रंथाची रचना झाली.

६) काव्यात - मुतनब्बीपासून इकबालपर्यंत सुंदर व श्रेष्ठ काव्याचा अथांग सागर पसरलेला आहे.

कोणी अशी विचारणा करू शकेल की, दुसऱ्या लोकसमुदायाने गर्व करण्याजोगे कार्य केले नाही काय? उत्तरादाखल असेच म्हणावे लागेल, ''इतक्या प्रचंड प्रमाणावर नाही.''

याशिवाय एक विशेष गुण असा आहे की, या शिकवणीचा प्रचार करण्यासाठी उभे राहिलेले हे राष्ट्र अशा वाळवंटातून निघाले जेथे भयंकर ऊन होते व निसर्ग-सौंदर्याचा अभाव होता. असे असूनसुद्धा त्यांनी इतकी उच्चकोटीची सौंदर्याची अभिरुचि व चव जगाला दिली.

होय! एका उम्मी (निरक्षर) च्या शिकवणीने हा सर्व चमत्कार घडविला व मानवजगताला उंचीच्या शिखरावर पोचविले.

मला इस्लामवर का प्रेम आहे, याची काही कारणे पुढे देत आहे.

# इस्लाम : ज्यावर माझे प्रेम आहे

## चमत्काराविना

चमत्काराविना सर्वांत मोठा चमत्कार दाखविणारे पैगंबर! धार्मिक गुरुवर सामान्य लोक सहसा विश्वास करीत नाहीत. बहुतेक गुरु आश्चर्यजनक व अस्वाभाविक गोष्टींचे प्रदर्शन करतात व त्यांचे चमत्कार पाहून सामान्य लोकांची चमत्कारप्रिय अभिरुचि त्यांच्यावर विश्वास करू लागते.

ईश्वरावरील विश्वाससुद्धा बहुतेक धर्मांत या चमत्कारप्रियतेवरच अवलंबून आहे. वास्तविकता अशी आहे की, जोपर्यंत मनुष्य ही गोष्ट मान्य करीत नाही की, पुण्यशील माणसाला शाश्वत जीवन आणि दुराचारी माणसांना शाश्वत अपयश मिळाल्याशिवाय राहणार नाही, तोपर्यंत शक्य नाही की मनुष्य पुण्यशीलता व पावित्र्याचे जीवन अवलंबण्यासाठी दृढता व मजबुतीने पुढे येऊ शकेल.

या उद्देशाच्या प्राप्तीसाठी आणि या गोष्टींना मन व मस्तकात बसविण्यासाठी आम्हाला पुराणांत, वेदांत, प्राचीन नियमांच्या पुस्तक व नवीन नियमांच्या पुस्तकांत धर्माकडे बोलाविणारे भिन्नभिन्न अलौकिक पद्धतींचा अवलंब करताना दिसतात.

केवळ पैगंबर मुहम्मद (स.) यांचे दिव्य व महान जीवन या चमत्कारापासून मुक्त असल्याचे दिसते.

इतकेच नव्हे तर ज़ेव्हाजेव्हा त्यांच्याकडे चमत्कार दाखविण्याची मागणी केली गेली तेव्हा उत्तरादाखल पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दिव्य कुरआन लोकांसमोर प्रस्तुत केले.

मूर्तिमंत चमत्कारापासून मुक्त राहून ज्ञान व विवेकाकडे बोलाविणारे व्यक्तित्व पैगंबर मुहम्मद (स.) यांचे आहे.

एका अन्य पैलूने पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनावर दृष्टी टाका. पैगंबर धार्मिक गुरु आहेत आणि त्याचबरोबर जिहाद (धर्मयुद्ध) चे नेतृत्वदेखील त्यांनी केले आहे.

ते उपदेश करणारे उपदेशकसुद्धा आहेत व एक कुशल शासक आणि मार्गदर्शकसुद्धा. या दोन्ही नात्यांचा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनात अत्यंत सुंदर समन्वय आढळतो.

बद्रची युद्धभूमी असो की बनी कैनकाचा वेढा, सवीकचे युद्ध असो की उहुदची

लढाई, तबूकची मोहीम असो अथवा खैबरचा संघर्ष; प्रत्येक ठिकाणी व प्रत्येक रण-क्षेत्रात पैगंबर मुहम्मद (स.) एक समंजस व शूर सेनापति म्हणून समोर येतात.

धार्मिक गुरु व त्याचबरोबर सेनापति! ही दोन्ही वैशिष्ट्ये एकाच वेळी जर कोठे आढळत असतील तर ती पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनात!

जिहाद (धर्मयुद्ध) व सैनिक कौशल्यात पैगंबर मुहम्मद (स.) निपुण असल्याचे दिसते. त्यांनी श्रद्धेच्या बळावर जे धैर्य आपल्या सहकाऱ्यांत उत्पन्न केले ती इतिहासाची एक महान कामगिरी होय.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विभिन्न देशांना जिंकण्याच्या लालसेने युद्धे केली नाहीत, की शत्रूंना खाली पाहावयास लावण्याच्या भावनेनेसुद्धा नाही. केवळ सत्याची मान उंचावण्याचा उद्देश त्यांच्या डोळ्यांसमोर होता आणि म्हणूनच याला 'जिहाद' म्हणून संबोधले गेले व या जिहादमध्ये आपल्या प्राणांची आहुती देणाऱ्या वीरांचे नाव 'शहीद' ठेवले गेले. शहीदचा अर्थ आहे आपले प्राण समर्पित करून सत्याची ग्वाही देणारे.

"युद्धाच्या मैदानातून घाबरून व बाणांच्या वर्षावाने भिऊन पळ काढणारा नरकवासी आहे."

अशी होती पैगंबर मुहम्मद (स.) यांची महान शिकवण. जिहादच्या संबंधाने याचा परिणाम असा झाला की, त्यांचे सोबती निर्भय होऊन पूर्ण धैर्याने सत्याचा संदेश घेऊन स्पेनपासून चीनपर्यंत पसरले.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दाखविलेल्या मार्गापासून जेव्हा मुस्लिम दूर गेले तेव्हापासूनच त्यांच्या पतनाचा प्रारंभ झाला. याच्यापूर्वी त्यांनी कधीही पराजयाचे तोंड पाहिले नव्हते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या काळात रोमन साम्राज्य एक विशाल व महान शक्ती मानले जात असे. परंतु पैगंबरांच्या शौर्य व दृढ विश्वासासमोर ही महान रोमन शक्ती थांबू शकली नाही. होय, हेच ते पैगंबर मुहम्मद (स.) आहेत, जे वाळवंटात जन्म घेऊन वाढलेले एक निर्धन व्यक्ती होते आणि मग ते मानवतेसाठी एक महान नेते सिद्ध झाले.

सैनिक सामुग्रीत पैगंबर मुहम्मद (स.) यांना कातड्याची लगामसुद्धा उपलब्ध नव्हती. विवशतेने कापडापासून बनविलेले लगाम सैनिक घोड्यांना लावले जात होते.

एकीकडे सैनिक सामुग्रीचे हे दुर्भिक्ष व दुसरीकडे विशाल रोमन साम्राज्य सर्व प्रकारच्या सैनिक साहित्य-सामुग्रीने सुसज्ज! शक्य होती तुलना दोघांची?

परंतु आपल्या सिद्धान्तावर विश्वास ठेवणाऱ्या पैगंबर मुहम्मद (स.) व त्यांच्या अनुयायींनी अल्लाहवर विश्वास ठेऊन मुकाबला केला व सफल झाले. एकीकडे पैगंबर जगाचा त्याग करणाऱ्या संन्याशापेक्षा अधिक नि:स्वार्थी व सरळ स्वभावाचे होते, तर दुसरीकडे अरबस्तान व त्याच्या परिसराचे सफल शासक होते. असे असूनदेखील पैगंबरांचे जीवन अत्यंत साधे होते. ते एका साध्या घरात राहत असत. पैगंबरांचा जीवनस्तर तसा नव्हता जसा दरबारी अमीर-उमराव व श्रीमंताचा असतो. त्यांचे जेवणसुद्धा अत्यंत साधे होते. येथपावेतो की त्यांच्यावर उपासमारीचीसुद्धा पाळी येत असे, ज्याची कल्पना करून आमचे डोळे सजल होतात.

वास्तविकत: ही सर्व वैशिष्ट्ये व सद्‌गुण इस्लामच्या देणग्या होत्या, ज्यांचे पैगंबर मुहम्मद (स.) खरे प्रतिनिधी व ध्वजवाहक होते.

म्हणूनच इस्लामवर माझे प्रेम आहे.

# ईसा मसीह (अ.) ईश्वराचे पुत्र होते का?

आम्ही अगोदरच सांगितले आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मूर्ती भंग करण्याचे व चित्रे हटविण्याचे एक महान क्रांतिकारी कार्य केले, याच्याशिवाय मानव इतिहासाचे आणखी एक महान क्रांतिकारी कार्य पैगंबरांच्या हस्ते संपन्न झाले, ज्याच्याविषयी समजून घेणे आवश्यक आहे.

पिता, पुत्र व दिव्य आत्म्याचा त्रिदेववाद, ख्रिस्ती लोकांच्या मौलिक श्रद्धांपैकी एक आहे. पापी लोकांना मुक्ती देण्यास आणि मानव पापांची शिक्षा स्वत: भोगण्यासाठी सुळावर चढून आदरणीय ईसा मसीह (येशू ख्रिस्त) यांनी आपले प्राण दिले. मग तिसऱ्या दिवशी जीवित होऊन पित्याच्या डाव्या बाजूला सिंहासनावर विराजमान झाले. अशी आहे ख्रिश्चनांची श्रद्धा.

- आदरणीय ईसा मसीह (येशू ख्रिस्त) ईश्वराचे पुत्र आहेत.
- ते मृत्युनंतर जिवंत होऊन उठले.

उपरोक्त या दोन्ही गोष्टी न मानणारे लोक ख्रिश्चन असू शकत नाहीत. या दोन्ही श्रद्धांचा पगडा ख्रिश्चन जगतावर असता पैगंबर मुहम्मद (स.) यांना पैगंबर बनवून पाठविले गेले. त्यांनी घोषित केले की, या दोन्ही श्रद्धा असत्य होत. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

- आदरणीय ईसा मसीह (अ.) ईश्वराचे पुत्र नाहीत. ते ईश्वराचे पैगंबर होते.
- त्यांना सुळावर चढविले गेले नाही.

खरी गोष्ट अशी आहे की, त्यांना अटक करण्यासाठी जेव्हा एक टोळी खोलीत घुसली तेव्हा त्यांच्याचपैकी एक मनुष्य त्यांच्या चेहऱ्याचा दिसू लागला. याच समान चेहऱ्याच्या माणसाला सुळावर चढविले गेले. दिव्य कुरआनमध्ये सांगितले गेले आहे-

"वास्तविकत: त्यांनी त्याला ठारही केले नाही आणि सुळावरसुद्धा चढविले नाही तर ही घटना त्यांच्यासाठी संदिग्ध झाली." *(दिव्य कुरआन- ४ : १५७)*

बायबलमध्ये ज्या पैगंबरांचे वर्णन आढळते, त्या सर्वांचा उल्लेख दिव्य कुरआनमध्ये सुद्धा आलेला आहे. जसे आदरणीय आदम (अ.), इब्राहीम (अ.), इसहाक (अ.), इस्माईल (अ.), याकूब (अ.), यूसुफ (अ.), मूसा (अ.), हारुन (अ.), दाऊद (अ.), सुलैमान (अ.), यूनुस (अ.), इलयास (अ.), जकरिया (अ.) इत्यादी पैगंबरांबरोबर दिव्य कुरआनमध्ये आदरणीय ईसा (अ.) यांचेसुद्धा नाव घेतले गेले आहे आणि स्पष्टपणे

हे विशद केले गेले आहे की, आदरणीय ईसा (अ.) एक पैगंबर होते. त्यांच्या ईशत्वाचे कोणतेही चिन्ह नव्हते. ख्रिश्चन व मुस्लिमांमध्ये काय मतभेद आहेत, ही गोष्ट येथे विचाराधीन नाही. मी ज्या दृष्टीने ही बाब पाहत आहे ती अशी आहे की, जो धर्म त्या वेळी प्रसिद्ध होता, जो त्या वेळी एक महान शक्ती म्हणून जगात अस्तित्वात होता, त्याच्या चुकीच्या धारणेविरुद्ध पैगंबर मुहम्मद (स.) यांनी कोणताही मुलाहिजा न ठेवता आवाज उठविला, परंतु या प्रयत्नात त्यांनी आदरणीय ईसा मसीह (अ.) (येशू ख्रिस्त) यांच्याबद्दलच्या आदर व सन्मानात कोणतीही कमतरता येऊ दिली नाही.

आदरणीय ईसा (अ.) यांचे हात दिव्य आत्म्याद्वारे मजबूत केले गेले होते. त्यांच्याद्वारे आदरणीय ईसा (अ.) यांना इन्जील (बायबल) प्रदान केले गेले होते. या दोन्ही वास्तविकता 'अल-किताब' (दिव्य कुरआन) ने अत्यंत स्पष्ट शब्दांत पूर्ण अभिमान व आदराने विशद केल्या आहेत. अगदी अशाच प्रकारे अन्य धर्मांच्या चुकीच्या गोष्टींचे तर दिव्य कुरआन खंडन करतोच, परंतु त्यांच्या महापुरुषांचा आदर करण्याची शिकवणसुद्धा देतो.

- चुकीच्या गोष्टींचे खंडन.
- व्यक्तींचा आदर

या दोन्ही गोष्टींना इस्लामने संदिग्ध ठेवलेले नाही, तर स्पष्टपणे या दोन्ही बाबतीत सावध राहण्याची व न्यायाने वागण्याची शिकवण दिली आहे.

आणीबाणीच्या काळात मलासुद्धा मिसाखाली तुरुंगात डांबले होते. त्या वेळी मला जगातील विभिन्न धर्मांच्या ग्रंथाचा अभ्यास करण्याची संधी लाभली होती. माझ्या नातेवाईकांनी, मित्रांनी आणि काही मुस्लिम सोबत्यांनी या दिव्य ग्रंथांना माझ्यापर्यंत पोचविले. या सर्व ग्रंथांचा अभ्यास केल्यावर ज्या ग्रंथाने मी अत्यंत प्रभावित झालो आणि जो मला स्वत:च्या दृष्टीने सर्वांत जास्त आवडला तो दिव्य कुरआन होय.

# दिव्य कुरआनचे विशेष गुण

विभिन्न प्रकारची धार्मिक पुस्तके आढळतात. त्यात प्रत्येकाची आपली वैशिष्ट्ये आहेत. हिंदू धर्माचे सर्वांत दिव्य ग्रंथ वेद आहेत. वास्तविकत: वेद म्हणजे मुनी व ऋषींनी ईश्वराचे गुणगान करीत गायिलेल्या गीतांचे संकलन होय. ख्रिश्चनांचे बायबल व यहूदी (ज्यू) लोकांच्या तौरातचे विभिन्न खंड वास्तविकत: माणसांनी आपल्या हातांनी लिहिलेल्या त्या त्या पैगंबरांचा इतिहास व जीवनचरित्र आहे.

अशाच प्रकारे जितके धार्मिक ग्रंथ आढळतात ते एक तर काही मान्यवर विभूतींनी रचलेले गीत आहेत, जे ईश्वराचे गुणगान करीत गायिले गेले आहेत अथवा ते ग्रंथ पैगंबरांच्या किंवा महापुरुषांच्या जीवनवृत्तान्तावर आधारित आहेत आणि ते काही लेखकांनी लिहिले आहेत. याउलट दिव्य कुरआनचे प्रमुख वैशिष्ट्य म्हणजे, हा ग्रंथ पैगंबर मुहम्मद (स.) यांनी लिहिलेला नाही आणि हा मानवाने गायिलेल्या भक्तिगीतांचे संकलनसुद्धा नाही. याची भूमिका केवळ इतिहासाचीच आहे असे नाही, तर-

- अल्लाहने 'लौहे महफूज' (सुरक्षित पाटी) वर जो आदरणीय ग्रंथ सुरक्षित ठेवलेला आहे तोच दिव्य कुरआन आहे.
- सुरक्षित पाटीवरील त्या ग्रंथातून परम आदरणीय देवदूत (फरिश्ते) माननीय जिब्रिल (अ.) यांनी हा वेळोवेळी प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यापर्यंत अल्लाहच्या आज्ञेने पोचविलेला आहे.

अशीच मुस्लिमांनी श्रद्धा आहे. दिव्य कुरआन लिहिलेला ग्रंथ नसून तो अवतरित ग्रंथ आहे. मुस्लिमांचा यावर दृढ विश्वास आहे. या ग्रंथाचे अनेक प्रमुख गुण आहेत. यामधील शब्दांच्या लयबद्धतेने मी प्रसन्न झालो आहे. ध्वनीला एखाद्या प्रकारची पावनता प्राप्त आहे काय? मी सांगेन की होय, आहे. ध्वनीच जगाचा पाया आहे.

वेदाचे कथन आहे की, 'ओम'च्या आवाजाने जगाची रचना झाली. बायबलचे कथन आहे की, सर्वप्रथम ईश्वराचे बोल होते मग हे जग झाले.

दिव्य कुरआनचा ध्वनि जेथे एक उत्तम गद्याचा ध्वनि आहे तेथेच त्याने खुद्द त्याच्यात एक उत्तम काव्याचा स्वर धारण केलेला आहे. एखाद्या अत्यंत सुंदर दृश्याचे सौंदर्यसुद्धा त्यात आढळते. गद्य, पद्य आणि छंदाने अनुगुंजित ब्रह्माण्डाचे सौंदर्य, याच गोष्टींचे संकलन आहे, दिव्य कुरआनचा ध्वनी!

''ही वाणी इतकी सुंदर आहे काय की यासारखी दुसरी वाणी असणे शक्य नसावी?''

असा प्रश्न आजसुद्धा केला जाऊ शकतो आणि त्या वेळीसुद्धा केला गेला होता जेव्हा दिव्य कुरआन अवतरित होत होता. दिव्य कुरआनने या प्रश्नाचे उत्तर त्याच वेळी देऊन टाकले होते की, जर तुम्हाला शक्य असेल तर याच्यासमान वाणी घेऊन या. या आव्हानाचे उत्तर देण्यास जग आजसुद्धा असमर्थ आहे. याचे उत्तर देण्याचा प्रयत्न ज्याने ज्याने केला, त्याला तोंडघशी पडावे लागले. दिव्य कुरआन म्हणतो -

"हे पैगंबर (स.)! आम्ही तुम्हाला कौसर प्रदान केले, तर तुम्ही आपल्या पालनकर्त्यासाठीच नमाज अदा करा आणि कुर्बानी (पशुबळी) द्या. तुमचा शत्रूच संततीहीन आहे." *(दिव्य कुरआन, १०८ : १ - ३)*

अशा प्रकारे सौंदर्य व ज्ञानाने परिपूर्ण या ग्रंथाच्या आयती (दिव्य कुरआनातील वाक्ये) आहेत. निपुण व विद्वान अरबी कवींनी त्याच वेळी याच्या तोडीचे लिखाण करण्याचा प्रयत्न केला होता आणि उघड शब्दांत आपल्या पराजयाचा स्वीकार या शब्दात केला होता -

"कुरआन ही मानवाची वाणी असू शकत नाही."

दिव्य कुरआनने आव्हान दिले,

"सांगून टाका की जरी मानव व जिन्न या सर्वांनी मिळून कुरआनसारखी एखादी वस्तू आणण्याचा प्रयत्न केला तरी ते आणू शकणार नाहीत, मग ते सर्व एक-दुसऱ्याशी सहयोग का करीनात." *(दिव्य कुरआन, १७ : ८८)*

दिव्य कुरआनमध्येच आम्हाला खुद्द त्याची खालीलप्रमाणे नावे आढळतात. ही सर्व नावे महत्त्वपूर्ण आहेत आणि ती महान सत्याचा सुगावा देतात.

| | | |
|---|---|---|
| १) अल-किताब | - | ग्रंथ |
| २) हब्लुल्लाह | - | अल्लाहची दोरी |
| ३) अल-बयान | - | स्पष्ट |
| ४) अल-बुरहान | - | स्पष्ट प्रमाण |
| ५) अल-मुहैमिन | - | रक्षण करणारी |
| ६) अल-मुबारक | - | बरकतवाला, मंगलप्रद |
| ७) अल-मुसद्दिक | - | पुष्टी करणारा |
| ८) अज्जिकरा | - | उपदेश, आठवण करून देणारा |
| ९) अन्नूर | - | प्रकाश |

| | | |
|---|---|---|
| १०) अल-बसाइर | - | आंतरिक प्रकाश |
| ११) अल-हुदा | - | सरळ मार्ग |
| १२) अर्रहम: | - | दया, कृपा, करुणा |
| १३) अश्शफा | - | उपचार |
| १४) अल-मोअज़ | - | उपदेश करणारा |
| १५) अल-हकम | - | निर्णय करणारा |
| १६) अल-मुबीन | - | स्पष्टपणे बोलणारा |
| १७) अल-अरबी | - | अरबी भाषेत |
| १८) अल-हिकमत | - | सर्वथा तत्त्वदर्शिता व ज्ञान |
| १९) अल-हक्क | - | सत्य |
| २०) अल-कय्यिम | - | मजबूत |
| २१) अल-फुरकान | - | (सत्य व असत्यामध्ये) फरक करणारा |
| २२) अत्तन्जील | - | उतरणारा (अवतरित) |
| २३) अल-हकीम | - | विवेकपूर्ण |
| २४) अज्जिक्र | - | आठवण करून देणे |
| २५) अल-बशीर | - | शुभवार्ता देणारा |
| २६) अन्नज़ीर | - | भयभीत करणारा |
| २७) अल-अज़ीज़ | - | शक्तिमान |
| २८) अर्रूह | - | आत्मा |
| २९) अल-मजीद | - | सन्मानित व प्रतिष्ठित |
| ३०) अल-करीम | - | प्रतिष्ठित |
| ३१) अल-मुकर्रम | - | आदर करणारा |
| ३२) अल-अजीब | - | अद्भूत |
| ३३) अल-मरफूआ | - | उच्च |
| ३४) अल-मुतहहर | - | दिव्य, शुचिर्भूत |
| ३५) अन्-नेअम: | - | देणगी |

'कुरआन'चा अर्थ आहे 'वाचला जाणारा!' हाच ग्रंथ वाचला जाणारा ग्रंथ आहे. जगात सर्वांत अधिक वाचला जाणारा ग्रंथ.

# उम्मी पैगंबर [१]

अल्लाहने उतरविलेल्या दिव्य कुरआन या ग्रंथाला सर्वप्रथम वाचणारा महापुरुष 'उम्मी' होता, अर्थात त्यांना अक्षरज्ञान नव्हते. 'उम्मी'चा अर्थ समज नसलेला आणि अक्कल नसलेला नव्हे, तर त्या लोकांना 'उम्मी' म्हटले जाते. ज्यांना लिहिता-वाचता तर येत नसावे. परंतु तरीसुद्धा त्यांची स्मरणशक्ती तल्लख असू शकते. त्यांच्याशी अगोदरपासून ईशआदेशांचे कोणतेही ज्ञान असत नाही.

तामिळ साहित्यात या गोष्टी प्रसिद्ध आहेत की, शेर (छंद) एकदा ऐकून तो पुन्हा सांगणारे (पुनरावृत्ती करणारे), दोनदा ऐकून पुनरावृत्ती करणारे, तीनदा ऐकून पुनरावृत्ती करणारे, चार वेळा ऐकून पुनरावृत्ती करणारे, अशा सर्वांची क्रमानुसार प्रशंसा केली जाते. परंतु अरबस्तानात शेकडो शेर (छंद) केवळ स्मरणाने भराभर ऐकविणारे 'उम्मी' होते.

काव्यातच नव्हे तर गणितशास्त्रातसुद्धा काही लोक इतकी अधिक स्मरणशक्ती असलेले आढळतात की, बुद्धी थक्क होऊन जाते. जर २१४ ला ३१४ ने गुणा म्हटले तर चांगले सुशिक्षितसुद्धा बुचकळ्यात पडतील आणि बऱ्याच वेळेनंतर त्याचे उत्तर देतील, पण काही लोक इतके तल्लख बुद्धी असलेलेसुद्धा असतात की, जे सुशिक्षित नसूनदेखील याचे उत्तर आपल्या बुद्धीने क्षणार्धात देतात. अशाच प्रकारे वंशावळी वगैरेच्या बाबतीतसुद्धा अनेक पिढ्यांपर्यंतची वंशावळी भरभर ऐकविणारे लोक अरबांत त्या वेळी होते, जे सुशिक्षित नव्हते. 'उम्मी'चा अर्थ समज नसलेला नव्हे. जर 'उम्मी'चा अर्थ समज नसलेला घेतल्यास पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या व्यापार व अनेक घटनांमधील त्यांच्या चातुर्य व बुद्धीच्या तल्लखपणाचे काही कारण देता येणार नाही. ते निरक्षर होते, परंतु त्यांची स्मरणशक्ती अत्यंत सशक्त होती आणि ते उच्च मनोवृत्तीचे स्वामी होते.

पैगंबरांना मुळात हे वैशिष्ट्य प्राप्त होते. त्याशिवाय ईश्वराची त्यांच्यावर अशी विशेष कृपा झाली की, जेव्हा त्यांच्यावर वह्य (ईशसंदेश) उतरत असे, तेव्हा ते स्पष्टपणे 'वह्य'च्या शब्दांची लोकांसमोर जशीची तशी पुनरावृत्ती करीत असत व त्यांचे शुद्धलेखन दुरुस्त करीत असत.

पैगंबर मुहम्मद (स.) यांना अल्लाहची मदत प्राप्त होती आणि त्यांच्या सहाबा (सोबती) वरसुद्धा अल्लाहची विशेष मेहरबानी होती. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या मंगल जिभेने सहाबा (रजि.) यांनी वही अर्थात ईशवाणीचे शब्द ऐकले आणि मग त्यांना तोंडपाठ केले. संपूर्ण दिव्य कुरआनच्या हाफीज (कुरआन तोंडपाठ असलेले लोक) ना आजसुद्धा जेव्हा आम्ही कुरआनचे पठन करताना पाहतो, तेव्हा त्यांच्या योग्यतेचा हेवाही वाटतो आणि दिव्य

१. ज्यांना लिहिता वाचता येत नव्हते आणि ज्यांना पूर्वीच्या आसमानी ग्रंथांचे कोणतेही ज्ञान नव्हते.

कुरआनच्या अद्भूत चमत्काराचे आश्चर्यदेखील वाटते. होय! एका 'उम्मी'नेच हे महान कार्य केले आणि या महान क्षमतांना उत्तेजन दिले.

सामान्यपणे अरबांमध्ये समजुतदारपणाची कमतरता असते, ते अडाणी, मार्गभ्रष्ट, रक्तपाताची आवड असणारे, बुद्धिहीन व अशिष्ट असतात, असे म्हटले जाते. या सर्व गोष्टी पूर्णत: निराधार आहेत. हजारो वर्षांपूर्वी जगाच्या अन्य देशांत बसणाऱ्या लोकांत जे सद्गुण आणि ज्या उणिवा होत्या, तेच सद्गुण व त्याच उणिवा अरब लोकांतदेखील आढळत होत्या. परंतु अरबांची एक विशेषता अशी होती की, त्यांनी अधिक शिक्षण घेतले नव्हते, परंतु त्यांची स्मरणशक्ती आश्चर्यजनक होती. अन्य देशांतील लोक स्मरणशक्तीच्या बाबतीत त्यांच्यापेक्षा फार पाठीमागे होते. केवळ अशिक्षित असणे अज्ञान आणि रानटीपणाचे कारण होऊ शकत नाही.

अरब लोकांपेक्षाही अधिक रानटीपणाचे प्रदर्शन कित्येक देशांत झाले आहे. किल्ल्यात माणसांचे शिर कापून टांगले गेले. जिवंत माणसांना आत ठेऊन भिंती रचून घेतल्या गेल्या. हत्तींच्या पायाखाली माणसांना चिरडले गेले. सुळावर चढवून शरीरावर खिळे ठोकले गेले. जिवंत पुरले गेले. चुन्यात गाडले गेले. उपाशी सिंहासमोर शिकारीप्रमाणे माणसे फेकली गेली. इतिहासाची पृष्ठे याची ग्वाही देतात की, रोमपासून तामिळनाडूपर्यंत रानटीपणाचे असले प्रदर्शन झाले. अरबांचा रानटीपणा व अज्ञान यापेक्षा जास्त होता काय? म्हणून हा एक निराधार आरोप आहे जो अरबांवर केला जातो. असे म्हटले जाते की, अरबांनी पैगंबरांच्या आवाहनाचा विरोध केला, पैगंबरांना त्रस्त केले गेले. परंतु मदीनावासीसुद्धा अरबच होते, ज्यांनी पैगंबरांना सहयोग दिला आणि त्यांचा हक्क अदा केला. त्यांनी पैगंबरांसाठी प्राणार्पण केले. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या नेतृत्वाखाली विभिन्न युद्धभूमीत आपले प्राण धोक्यात घालून युद्धे केली.

काबागृहात ठेवलेल्या मूर्ती हटविणे आणि त्यांची पूजा असत्य ठरविण्याचे क्रांतिकारी कार्यसुद्धा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या नेतृत्वात अरबांच्याच हाताने पार पडले.

अशी महान क्रांती चौदाशे वर्षांपूर्वी जर भारतात, चीनमध्ये किंवा एखाद्या अन्य देशात आणली गेली असती, तर तेथील जनतेने यासंबंधी अशाच प्रकारच्या प्रामाणिकतेचे प्रमाण दिले असते का की, ज्या प्रकारच्या प्रामाणिकतेचे प्रमाण अरबांनी दिले? या दृष्टीने जेव्हा आम्ही अरबांना पाहतो तेव्हा त्यांची महानता चांगल्या प्रकारे स्पष्ट होते. अरबस्तानची भूमी मरुभूमी आहे. होय, या वाळवंटातच ही महान क्रांती आली. या दृष्टीने मी त्या देशाला व तेथील रहिवाशांना मोठ्या आदर व श्रद्धेने पाहतो. त्यांना माझे शतश: प्रणाम!

ही क्रांती आणणाऱ्या या महान ग्रंथाची काही वैशिष्ट्ये पुढे येतील.

# जिवंत भाषेतील जिवंत ग्रंथ

वेद, बायबल आणि अन्य धर्मांचे ग्रंथ व दिव्य कुरआनमध्ये एक मोठे अंतर आढळते. हिंदु धर्माचे मौलिक ग्रंथ चार वेद आहेत आणि या वेदांची भाषा संस्कृत आहे. 'संस्कृत' या शब्दाचाच मुळात अर्थ नवीन भाषा व परिष्कृत भाषा आहे. जर असे मानले की, वेद प्रारंभिक काळापासूनच माणसांना मिळाले आहेत, जशी काही लोकांची धारणा आहे, तर याचा अर्थ असा होतो की, मुळात ते संस्कृतमध्ये नाहीत, तर ते संस्कृतपूर्वीच्या एखाद्या भाषेत असतील. नंतर आलेल्या भाषेत जेव्हा वेद लिहिले गेले तेव्हा ही गोष्ट स्पष्ट आहे की, मूळ वेदांत व नवीन भाषेत लिहिले गेलेल्या वेदांत अंतर पडणे एक स्वाभाविक गोष्ट आहे. परंतु दिव्य कुरआन अरबी भाषेत अवतरला व अगदी त्याच अरबी भाषेत आजसुद्धा आमच्यासमोर आहे. त्यात तिळमात्रसुद्धा कोणताही फरक आढळत नाही.

यहूदी (ज्यू) लोकांचा तौरात ग्रंथ पाहा. त्याच्या अवतरणानंतर शेकडो वर्षांनी इस्राइली (ज्यू) लोकांनी तो संकलित केला. वास्तविकता अशी आहे की, तौरात माननीय मूसा (अ.) यांच्यावर इबरानी (हिब्रू) भाषेत अवतरित झाला होता. शेकडो वर्षांनंतर तो लिहिला गेला. त्यानंतर हा लिहिलेला संग्रह नष्ट झाला. लॅटिन व ग्रीक भाषेतील बायबलच उरले. त्यानंतर ग्रीक व लॅटिन भाषेतील तौरातच्या भाषांतरावरून इस्राइली लोकांनी पुन्हा इबरानी भाषेत तौरातला रुपांतरित केले. अशा प्रकारे भाषांतरावरून मूळ भाषेत परिवर्तीत केलेल्या ग्रंथाची काय स्थिती असेल हे प्रत्येकजण जाणू शकतो.

'डेड सी' जवळील कुमरानच्या लेणीत इबरानी भाषेत लिहिलेले जे कागद सापडले आहेत, तेसुद्धा बायबलचे केवळ इकडचे-तिकडचे भागच आहेत. हा बायबलचा नवीनतम शोध आहे.

एखादा ग्रंथ भाषांतरावर अवलंबून नसलेला, आपल्या मूळ भाषेत ज्यात तो अवतरित झाला, उपलब्ध आहे तर तो दिव्य कुरआन आहे. ही विशेषता केवळ त्यालाच प्राप्त आहे.

आदरणीय ईसा मसीह (अ.) यांच्यावर अवतरित झालेला ग्रंथ 'सुरयानी'ची एक भाषा 'आरामी' होती. परंतु तो सर्वप्रथम ग्रीक भाषेत लिहिला गेला. मग ग्रीक भाषेतून लॅटिन भाषेत त्या ग्रंथाचे भाषांतर केले गेले. मग विभिन्न भाषांत अनुवादित स्वरुपात आमच्याजवळ आहे. परंतु दिव्य कुरआन ज्या भाषेत अवतरित झाला होता

त्याच भाषेत आजसुद्धा आमच्यासमोर आहे.

दिव्य कुरआनच्या एका अन्य विशेष गुणावर विचार करा.

- हिंदू धर्माचे वेद आपल्या मुळ भाषेऐवजी संस्कृत भाषेत लिहिले गेले, परंतु संस्कृतसुद्धा हल्ली बोलाचालीची - व्यवहारातील भाषा नाही.
- यहूदींच्या धार्मिक ग्रंथाची इबरानी भाषा शेकडो वर्षांपर्यंत बोलचालची भाषा नव्हती. (इस्त्राईलने या भाषेला पुन्हा आपल्या जनतेवर थोपले आहे.)
- अशाच प्रकारे आदरणीय ईसा (अ.) यांची भाषा 'आरामी' व गौतम बुद्धांची भाषा 'पाली' या दोन्ही हल्ली बोलचालच्या भाषा नाहीत.

ज्या-ज्या भाषांत आसमानी ग्रंथांचे अवतरण झाले आहे, त्या सर्व भाषा आज मृत (प्रयोगात नसलेल्या) झालेल्या आहेत. याच्या उलट दिव्य कुरआन व फक्त दिव्य कुरआनच प्रयोगात असलेल्या जिवंत भाषेत जिवंत ग्रंथाच्या रूपात आमच्यासमोर आहे.

दिव्य कुरआनच्या एका अन्य गुणावर विचार करा - (१) चार वेद, (२) यहूदी लोकांचा ग्रंथ 'तौरात', (३) आदरणीय ईसा मसीह (अ.) यांचा 'बायबल', (४) गौतम बुद्धांचा ग्रंथ 'तम्मा बुदम'. हे सर्वच ग्रंथ ज्या महापुरुषांना मिळाले होते, त्यांच्या देहावसानानंतर दीर्घकाळाने या ग्रंथांचे संकलन झाले. परंतु कुरआन आणि केवळ कुरआनच तो ग्रंथ आहे, ज्याला तत्काल क्रमबद्ध केले गेले आणि जसजसा तो अवतरित होत गेला, तसतसे त्याला क्रमबद्ध केले जात राहिले आणि लिहिले जात राहिले. संपूर्ण कुरआन पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितल्याप्रमाणे क्रमानुसार एका प्रतीत एकत्रित केले. हे कार्य त्यांनी दिव्य कुरआनच्या सुरक्षेच्या उद्देशानेच केले. जेव्हा दिव्य कुरआन अवतरित होत होता तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांना ऐकवीत गेले. दिव्य कुरआन बिनचूक लिहिले जाण्यावर विशेष लक्ष दिले गेले.

जसजसा हा ग्रंथ अवतरित होत गेला तसतसा विशेष सावधगिरीने त्याला व्यवस्थितपणे लिहिण्याची व्यवस्था होत राहिली. इतक्या व्यवस्थितपणे व सावधगिरीने लिहिला जाणारा ग्रंथ केवळ कुरआनच आहे.

# कोणापासूनही लपवून न ठेवलेला ग्रंथ

- 'दिव्य कुरआन'च्या सर्वच्या सर्व आयती अल्लाहकडून अवतरित झाल्या आहेत.
- 'वेदांत' ईश्वराच्या प्रशंसेच्या उद्देशाने गायिलेली, मानवाने लिहिलेली गीते समाविष्ट आहेत.
- 'तौरात'मध्ये इस्त्राईल जनसमूहाचा इतिहास व पैगंबरांचे उपदेशसुद्धा सामील केले गेले आहेत.
- 'इंजील' (बायबल) मध्ये इतिहासही आहे आणि पैगंबरांचे व सुधारकांचे उपदेश व प्रवचनसुद्धा आहेत.

परंतु दिव्य कुरआन तो ग्रंथ आहे ज्यातील सर्वच्या सर्व आयती अल्लाहकडून आहेत. मानवाच्या मार्गदर्शनासाठी त्यात ऐतिहासिक घटना आणि बाह्य जगतात आढळणाऱ्या संकेतांचा उल्लेख आणि ज्ञान व विवेकाने परिपूर्ण उपदेशदेखील आढळतात. परंतु ते सर्व अल्लाहकडूनच अवतरित झाले आहेत, पैगंबर मुहम्मद (स.) अथवा अन्य कोणाकडून त्याच्यात काहीही घातले गेले नाही.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या स्वत:च्या वचनांना, कर्मांना आणि उपदेश व प्रवचनांना स्वतंत्रपणे संकलित केले गेले आहे. त्यातील कोणतीही गोष्ट दिव्य कुरआनमध्ये समाविष्ट केली गेली नाही. अशा प्रकारे कोणतीही मिसळ अथवा मिश्रण न होता अल्लाहच्या वचनांचे जे संकलन झाले तोच दिव्य कुरआन होय.

अन्य धर्मांचे ग्रंथ काही विशिष्ट वर्गांच्या पठनासाठीच असतात, उदाहरणार्थ, ब्राह्मण, आचार्य व भिक्षु वगैरे.वेदाचा एक अर्थ लपविण्याची वस्तू सुद्धा आहे, अर्थात ज्या वस्तुला आम लोकांच्या दृष्टीपासून लपवून ठेवले पाहिजे. अल्लाहचे वचन अल्लाहच्या दासासाठी आहेत. कोणताही भेदभाव न करता सर्व खास व आम लोकांसाठी आहे. सर्वांनी पठन करण्यासाठी आणि सर्वांनी कंठस्थ करण्यासाठी हा आदेश केवळ दिव्य कुरआनच देतो.

दिव्य कुरआनचे हाफीज (कुरआन कंठस्थ केलेला मनुष्य) शेकड्याने व हजारांच्या संख्येत प्रत्येक देशात व प्रत्येक काळात आढळतात. हे वैशिष्ट्यसुद्धा केवळ कुरआनचेच आहे.इतिहासावरून कळते की, अनेक लोकांना वेदाचे पठन केल्याबद्दल अथवा ते ऐकल्याबद्दल शिक्षेस पात्र ठरविले गेले आणि शिक्षाही दिली गेली.

या उलट दिव्य कुरआनचे वैशिष्ट्य असे आहे की तो म्हणतो की, वाणी अल्लाहकडून आहे. याचे श्रवण करणे व पठन करणे सर्वांसाठी आवश्यक आहे आणि ही गोष्ट सौभाग्याची आहे.

इतिहास साक्षी आहे की, तिरुकोतियोच्या मंदिराजवळ वेदांचे पठन करण्याच्या

अपराधासाठी रामानुजनास यातना दिल्या गेल्या.

दिव्य कुरआनची शिकवण तर अशी आहे की, दुसऱ्यांना ऐकण्याची संधी उपलब्ध करून दिली जावी. त्यांनी अल्लाहची वाणी ऐकावी, शक्य आहे की त्यांना सन्मार्ग मिळेल.

वेदाची व्याख्या करणाऱ्या आद्य शंकराचार्यांचा त्यांच्या आईच्या मृत्युसमयी समाजाने बहिष्कार केला. दुसरीकडे दिव्य कुरआन मोठ्या आवाजाने पठन करणाऱ्या माननीय अली (रजि.) यांना 'बाबुलइल्म' (ज्ञानाचे द्वार) म्हटले गेले. अल्लाहचा ग्रंथ त्याच्या सेवकांसाठी आहे आणि लोकांनी त्याचे पठन केले पाहिजे, या गोष्टीची ताकीद देऊन केवळ अशी शिकवण इस्लामच देतो.

या शिकवणी आणि ताकीदचा परिणाम असा झाला की, कुरआन नष्ट होण्यापासून वाचला. आज मोरोक्कोपासून इराकपर्यंत जवळजवळ २० कोटी लोकांची व्यवहारातील भाषा कुरआनची भाषा अरबी आहे. कुरआनने जगातील लोकांनासुद्धा जीवनसंदेश दिला आणि त्याचबरोबर अरबी भाषेलासुद्धा जिवंत आणि अमर बनविले.

काही अस्मानी ग्रंथ मानव जीवनासंबंधित अनावश्यक गोष्टी प्रस्तुत करतात. ज्यामुळे विभिन्न प्रकारच्या अडचणी व गुंतागुंती निर्माण होतात. काही अन्य प्रकारचे धार्मिक ग्रंथ असे आहेत की, ते मानव व त्याच्या प्रश्नासंबंधी कोणतीही चर्चा करीत नाहीत, तर ते दर्शनशास्त्राची नसती उठाठेव असल्याचे दिसतात. पहिल्या प्रकारचे ग्रंथ लोकांना विनाकारण अनावश्यक साखळदंडात जकडतात तर दुसऱ्या प्रकारचे ग्रंथ माणसाला बेलगाम बनवितात. याच्या विपरीत दिव्य कुरआनचे वैभव काही औरच आहे. हा ग्रंथ एकीकडे तर मानवांना मौलिक आस्था व धारणांचे शिक्षण देतो तर दुसरीकडे हा त्यांना कायदा, नियम व शिस्त शिकवितो आणि त्यांच्या बंधनांना आवश्यक ठरवितो. आस्था, धारणा आणि नियम निश्चित केल्यानंतर तो मानवचिंतन व कार्यशक्तीला या गोष्टीचे स्वातंत्र्य देतो की, त्याने कुरआनच्या शिकवणी व त्याच्या उपदेशानुसार आपले काम करीत राहावे. अशा प्रकारे मौलिक तत्त्वांच्या बंधनांबरोबरच गौण बाबतीत कार्य व चिंतनाचे स्वातंत्र्य प्रदान करणारा दिव्य कुरआन एकमेव ग्रंथ आहे.

"पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यापेक्षा अधिक कोणालाही विभिन्न समस्यांवर सल्लामसलत करणारा मनुष्य म्हणून आम्ही पाहिले नाही," अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सोबत्यांनी त्यांना ही श्रद्धांजली दिली आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांना हे विशेष गुण दिव्य कुरआनच्याच कृपाप्रसादाने प्राप्त झाले आहेत.

आम्ही पाहतो की आम धार्मिक ग्रंथ सत्ताधारी, भांडवलदार, बलवानांचे समर्थक व सहाय्यक आहेत आणि निर्बलांवर अत्याचार करण्यात सहाय्यक सिद्ध होत आहेत. परंतु दिव्य कुरआन तो 'ग्रंथ' आहे जो निर्बलांना आश्रय देतो व अत्याचाऱ्यांना कठोरपणे धरतो. निस्संदेह दिव्य कुरआनला मानवस्वातंत्र्याचा चार्टर व मॅग्नाकार्टा म्हटले जाऊ शकते, यात कोणतीही अतिशयोक्तीची गोष्ट होणार नाही.

# मानवजातीचा मॅग्नाकार्टा

सामान्यपणे धार्मिक ग्रंथ असा दावा करतात की, ते मानवाची भेट ईश्वराशी करून देतात, परंतु व्यवहारात जी गोष्ट आमच्यासमोर येते ती अशी आहे की, ते माणसांना शासक, भांडवलदार व पुजारी वगैरेंच्या समोर नतमस्तक होण्यास भाग पाडतात आणि त्यांना साखळ्यांनी जकडणे व त्यांना लाचार बनवून टाकण्याचे कार्यसुद्धा हेच ग्रंथ करतात.

शासकांना ईश्वराचा अवतार, प्रतिनिधी व ईश्वराची छाया यासारख्या पदव्या दिल्या गेल्या. काही ग्रंथांत स्वातंत्र्याची गोष्ट केवळ सांगितली गेली आहे, परंतु व्यवहारात माणसाला माणसाच्या गुलामगिरीतून मुक्त करण्यात ते अयशस्वी ठरले आहेत. दुसरीकडे आम्ही पाहतो की, दिव्य कुरआन बुलंद आवाजात सांगतो की, माणसाने माणसाची गुलामगिरी करता कामा नये. एका माणसाने दुसऱ्या माणसासमोर हात पसरता कामा नये. माणसाने माणसाचे अनुसरण करू नये. माणसाने माणसाची पूजा करता कामा नये. दिव्य कुरआनने या शिकवणींचे वर्णन इतक्या विस्ताराने केले आहे की, त्यांच्याप्रमाणे वागणाऱ्यांच्या रोमारोमातून हे विचार पसरत राहावेत. अशा प्रकारे दिव्य कुरआनने उपासना व पूजा करण्यास योग्य केवळ अल्लाहच असल्याचे सांगितले आहे. कुरआनने हेदेखील स्पष्ट केले आहे की, केवळ अल्लाहचे आज्ञापालन करावे आणि मदतसुद्धा केवळ त्याचीच मागितली पाहिजे.

या शिकवणी ग्रहण केल्याने काय होते आणि प्रत्यक्षात काय घडले? मनुष्यावरील मनुष्याचे ईशत्व नष्ट केले गेले. मनुष्याचा मनुष्यावरील अत्याचार व सर्व प्रकारचा अतिरेक बंद झाला. मानवचिंतन व विकासावर बंदी घालणाऱ्या अडथळ्यांना समाप्त केले गेले.

माणसाला खरे स्वातंत्र्य प्राप्त झाले. प्रत्येकाच्या स्वाभिमानाला उधाण आले. मानवी जीवनातून अंधकार नाहीसा झाला आणि प्रकाशाची धारा प्रवाहित झाली.

मानवचिंतनाच्या बगिचात मधूर वारे वाहू लागले आणि मनुष्य आनंद व उल्हासाने डोलू लागला. माणसावरील माणसाचे ईशत्व पूर्णपणे समाप्त करण्याची अद्वितीय सफलता ज्या ग्रंथाने प्राप्त केली, त्या ग्रंथाचे नाव आहे दिव्य कुरआन!

यापेक्षा श्रेष्ठ मानव-अधिकारांचे घोषणापत्र मानवजातीने कधीही पाहिलेले नाही. मॅग्नाकार्टापेक्षा कितीतरी श्रेष्ठ, अत्यंत महान मानव-अधिकारांचे घोषणापत्र जर कोणते असेल तर तो दिव्य कुरआन आहे.

या ग्रंथाने गुलामांच्या हातात पडलेल्या बेड्या तोडल्या. संपूर्ण मानवजातीला एकाच रांगेत समान अधिकारासह आणून उभे केले. मानवी-स्वातंत्र्याचे हे विधान,

प्रकाशाचा हा मनोरा संपूर्ण मानवजातीला उद्देशून सांगत आहे -

"मानवांनो! आम्ही तुम्हाला एकाच पुरुष व स्त्रीपासून निर्माण केले आणि मग तुम्हास विविध कबिले आणि राष्ट्रांत विभागले जेणेकरून तुम्ही एक-दुसऱ्याला ओळखावे." *(दिव्य कुरआन, ४९ : १३)*

या शिकवणीने लोकांना दाखविले की मानवजात एक कुटुंब आहे. एकमेकाला ओळखण्यासाठीच टोळ्या, समूह व वंश आणि कुटुंब बनले आहेत.

- जन्माच्या आधारे उच्च - नीच.
- जातीच्या आधारे उच्च - नीच.
- कुटुंबाच्या आधारे उच्च - नीच.

हे सर्व भेदभाव समूळ उपटून फेकून दिले गेले. सर्व मानव स्वतंत्र जन्मले आहेत. ते सर्व समान अधिकार व समान जीवनाचे अधिकारी आहेत.

येथे हा प्रश्न उद्भवतो की, माणसांना दुसऱ्यांच्या शासनातून मुक्त करून व त्यांना समान अधिकार देऊन कुरआनने त्यांना निरंकुश सोडून दिले आहे काय? त्यांना अवज्ञाकारी बनविले का? त्यांना जबाबदाऱ्यांपासून मुक्त केले का? मुळीच नाही.

दिव्य कुरआनने अल्लाहचे भय बाळगण्याची ताकीद दिली आहे. फक्त एकच अल्लाहची भीती बाळगा, दुसऱ्यांना भिऊ नका, याचा आदेश दिला. या शिकवणीद्वारे ईश्वराचे भय मनात वसवून केवळ ईशकायद्यापुढे नतमस्तक होण्याचे प्रचंड धैर्य दिव्य कुरआनने मानवाला दिले.

अत्याचारी शासक, अन्यायावर आधारित कायदे, शोषण करणारे, युद्ध, आजार, मृत्यू, निर्धनता व दारिद्रय, धन व प्रतिष्ठेला हानी, अशा सर्व गोष्टींना न भिण्याचे व घाबरण्याचे आणि त्याने न डळमळण्याचे शिक्षण व प्रशिक्षण देऊन दिव्य कुरआनने माणसाला शूर, प्रतिष्ठित व गौरवशाली बनविले. माणसाला या महान गुणाने संपन्न करणारा एकमेव ग्रंथ आहे आणि तो आहे दिव्य कुरआन.

वाळवंटाच्या कुशीत वाढणारे अरब आपल्या टोळ्यांच्या गृहयुद्धात गुरफटलेले होते. समकालीन सभ्यता व संस्कृतीचे त्यांना वारेदेखील लागले नव्हते. या महान ग्रंथाने अशा लोकांना सभ्यता व सुशीलतेने सुसज्जित केले आणि त्यांना जगावर शासन करण्याची क्षमता, विवेक आणि उपाय समजावून देऊन त्यांना हरप्रकारे शूर बनविले.

ही मोठी कामगिरी वास्तविकत: कुरआनच्या क्रांतिकारी शिकवणींचा परिणाम

होय. मी या सत्याची घोषणा एखाद्या असमंजस्याविना हिमालयाच्या शिखरावर उभा राहून करण्यास तयार आहे.

या दिव्य ग्रंथाची एक विशेषता अशी आहे की, याने प्रत्येक पावलावर या गोष्टीची ताकीद केली आहे की, माणसाने प्रत्येक स्थितीत-पायाला चिकटून राहावे आणि कधीही न्यायाला आपल्या हातातून सुटू देऊ नये. सत्य व न्यायाची बाजू सोडणाऱ्यांना त्याने अंतिम दिनाच्या दु:खपूर्ण यातनांचे भय दाखविले आहे. आपल्या स्वत:च्या नातेवाईकांचा मामला असला तरीसुद्धा त्यांच्यासाठी न्याय बाजू सोडू नका. या गोष्टीची ताकीद कुरआनने दिली आहे. याच न्यायाच्या शिक्षणाचा प्रभाव आहे की, इस्लामी राज्याच्या अद्वितीय सत्य व न्यायाचे नमुने इतिहासात सुरक्षित आहेत.

मानवी स्वातंत्र्य, समानता व न्याय या तीन उत्तम मौलिक सिद्धान्तावर दिव्य कुरआन मानव समाजाची निर्मिती करतो.

म्हणून ही गोष्ट स्पष्ट होते की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी कोणताही चमत्कार दाखविण्याचा प्रयत्न केला नाही आणि ईशत्वात भागीदार असण्याचाही दावा केला नाही. सन्मार्ग दाखविण्यासाठी पाठविले गेलेले ते एक मनुष्यच होते.

गोष्ट केवळ इतकीच नव्हे तर दिव्य कुरआन म्हणतो की, या सत्य मार्गापासून जर पैगंबर मुहम्मद (स.) सुद्धा हटले तर कोणतीही शक्ती त्यांना अल्लाहच्या पकडीपासून वाचवू शकणार नाही.

''आणि जर तुम्ही या ज्ञानानंतर जे तुमच्यापाशी आलेले आहे, त्या (अधर्मियांच्या) इच्छांचे अनुसरण केले तर अल्लाहच्या पकडीपासून तुम्हाला वाचविणारा कोणताही मित्र अथवा मदत करणारा मिळणार नाही.'' *(दिव्य कुरआन, २: १२०)*

जेव्हा आम्ही या आयती वाचतो तेव्हा हृदय कंपित होते. मानवतेसाठी ज्याला 'उत्तम आदर्श' म्हटले गेले, तो अल्लाहला सोडून आपल्या इच्छेचे अनुसरण करू शकतो काय की जेणेकरून त्याने शिक्षेचा भागीदार व्हावे? नाही, कदापि होणार नाही. तथापि दिव्य कुरआन स्पष्ट शब्दांत सावध करतो की, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडून सुद्धा जर चूक झाली तर त्यांना अल्लाहच्या पकडीपासून वाचविणारा कोणताही मित्र आणि मदत करणारा असणार नाही.

कोणत्याही धार्मिक ग्रंथात तो आणणाऱ्यास इतकी उघड व स्पष्ट ताकीद दिली गेली आहे काय? मी सांगेन की अजिबात नाही.

मी सुद्धा तुमच्यासारखाच एक मनुष्य आहे. मी सुद्धा चूक करेन तर अल्लाहकडून

पकडला जाईन. या दाव्यासह एखाद्या धर्माला प्रस्तुत करणारा जर कोणी आहे तर ते पैगंबर मुहम्मद (स.) आहेत. जर एखादा धर्म असा पैगंबर देऊ शकला आहे तर तो केवळ इस्लाम धर्म आहे.

याशिवाय यात आणखी एक आश्चर्यजनक गोष्ट आहे जी आम्हाला इतर धर्मांच्या इतिहासात कोठेही आढळत नाही आणि ती अशी की, पैगंबर मुहम्मद (स.) यांना त्यांच्या काळातसुद्धा मनुष्यच समजले गेले आणि त्यांच्या निधनानंतरसुद्धा आजतागायत मनुष्यच समजले जाते आणि सदैव मनुष्यच समजले जाईल.

कित्येक धार्मिक गुरु मनुष्याच्या रूपाने जन्मले, आयुष्यभर मनुष्य म्हणूनच राहिले. त्यांनी समाजात सुधारणा व कल्याणाचे कार्य केले आणि मग त्यांचे देहावसान झाले. परंतु त्यांचे डोळे बंद होताच त्यांना ईश्वराचा दर्जा दिला गेला.

उदाहरण म्हणून गौतम बुद्धांनाच घ्या. ते जन्माला मनुष्य म्हणूनच आले होते. होय, हे सत्य आहे की, ते कल्याणकार्य करीत होते व चांगुलपणाचा प्रचार करीत होते. परंतु त्यांचे निधन झाले न झाले तोच त्यांना ईश्वर बनविले गेले. परंतु इस्लाममध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांना कधीही ईश्वराचे स्थान दिले गेले नाही. ते फक्त मनुष्यच आहेत. एक चारित्र्यसंपन्न मनुष्य आणि पैगंबर म्हणून संपूर्ण मानवजातीसाठी उत्तम आदर्श.

या मर्यादेपर्यंतच पैगंबर मुहम्मद (स.) यांची प्रशंसा गत चौदाशे वर्षांपासून केली जात आहे. अल्लाहचा दर्जा पैगंबरांना कधीही दिला गेला नाही.

# इस्लाम : अन्नादुराई यांच्या दृष्टीने

तामिळनाडूचे नाजी मुख्यमंत्री अन्नादुराई[१] यांनी दिनांक ७ ऑक्टोबर १९५७ रोजी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या चरित्रावर एक भाषण दिले होते जे येथे प्रस्तुत करणे लाभदायक सिद्ध होईल. आपल्या भाषणात अन्नादुराई यांनी म्हटले होते,

इस्लामच्या सिद्धान्तांची व धारणांची जितकी गरज सहाव्या शतकात जगाला होती, त्यापेक्षा कितीतरी अधिक त्यांची आवश्यकता आज जगाला आहे. आज जग विभिन्न विचारधारांच्या शोधात ठेचा खात आहे आणि कोठेही त्याला सुख-शांती लाभू शकली नाही.

इस्लाम केवळ एक धर्म नाही तर तो एक जीवनसिद्धान्त व अत्युत्तम जीवनप्रणाली आहे. या जीवनप्रणालीला जगाच्या अनेक देशांनी अवलंबिले आहे.

माझ्या आपल्या धार्मिक विचारात व सीरत (पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवनचरित्र) च्या या सभेतील माझ्या उपस्थितीदरम्यान कोणतीही प्रतिकूलता नाही. इस्लामला एक जीवनप्रणाली समजूनच मी या सभेत सामील झालो आहे.

आम्ही जीवनसंबंधी इस्लामी दृष्टिकोन व इस्लामी जीवनप्रणालीचे का बरे इतके प्रशंसक आहोत? ते केवळ अशासाठी की इस्लामी जीवनसिद्धान्त माणसाच्या मनात उत्पन्न होणाऱ्या शंका व आशंकांचे उत्तर संतोषजनक पद्धतीने देतात.

आदरणीय पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीत सर्वप्रथम शिकवण ही आहे "अल्लाहसमवेत कोणालाही सामील केले जाऊ नये", या शिकवणीचा मी मन:पूर्वक आदर करतो आणि हिला आदर व प्रशंसेच्या दृष्टीने पाहतो.

या शिकवणीचा इतका आदर का केला जावा? ते अशासाठी की, ही शिकवण मानवचिंतनाला विचार करण्यास भाग पाडते व विचार करण्यास उत्तेजित करते.

अल्लाहबरोबर कोणालाही सामील केले जाऊ नये. का केले जाऊ नये? अल्लाहची सत्ता व गुण काय आहेत? माणसाला या सर्व गोष्टीवर विचार करण्याची संपूर्ण सामुग्री ही शिकवण उपलब्ध करून देते.

एका तामिळ विचारवंताने म्हटले आहे -

---

१. अन्नादुराई द्रविड मुन्नेत्र कळघम या पक्षाचे संस्थापक होते. ते डी. एम. के. सरकारचे प्रथम मुख्यमंत्री म्हणून निवडले गेले होते. ते एक कुशल राजनीतिज्ञच नव्हे तर एक चिंतकसुद्धा होते. डी.एम.के. व ए.आय.डी.एम.के. च्या क्षेत्रांत त्यांचे नाव मोठ्या आदराने घेतले जाते.

“ज्याने पाहिले त्याला मिळाले नाही,

ज्याला मिळाले त्याने पाहिले नाही.

ज्याने पाहिले त्याने सांगितले नाही,

ज्याने सांगितले त्याने पाहिले नाही.”

अल्लाहचे गुण अमर्याद आहेत. त्यात रमून जाणे व त्यात निरंतर पुढे जाण्यातच कमाल आहे.

अल्लाहबरोबर कोणाला सामील करण्याचा अर्थ असा होतो की, एखाद्याला आम्ही अल्लाहच्या बरोबरीचा मानणे.

अल्लाहच्या बरोबरीचा कोण बरे असू शकेल? म्हणूनच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अनेकेश्वरत्वास मनाई केलेली आहे.

अन्य धर्मात अनेकेश्वरत्वाची शिकवण अस्तित्वात असल्यामुळे आमच्यासारखे लोक अनेक नुकसानीला बळी पडले आहेत. अनेकेश्वरत्वाच्या मार्गांना बंद करून इस्लाम मानवाला महानता व उच्चता प्रदान करतो आणि अवनती व तिच्या भयंकर परिणामापासून मुक्ती प्रदान करतो.

इस्लाम माणसाला सिद्ध पुरुष व भला मानव बनवितो. अल्लाहने ज्या उंचीपर्यंत पोचण्यासाठी मानवाला निर्माण केले आहे ती उंची प्राप्त करणे व तिथपर्यंत वर जाण्याची शक्ती व क्षमता माणसात इस्लामद्वारे उत्पन्न होते.

अल्लाहला हे संभव होते की, त्याने स्वत: प्रकट होऊन मानवाला हा आदेश द्यावा की, “मला ईश्वर म्हणून स्वीकार कर.” अशा स्थितीत मानवासाठी आपल्या चिंतनशक्तीचा प्रयोग करण्याची कोणतीही संधी उरली नसती. अशा प्रकारे मानवाच्या चिंतनशक्तीला मोठा आघात पोचला असता आणि मानव मानसिक व चिंतनविकासापासून वंचित राहिला असता. परंतु पैगंबरांना पाठवून त्यांच्याद्वारे जेव्हा अल्लाहने हा संदेश दिला की, “हे माझ्याकडून पाठविलेले पैगंबर आहेत,” तेव्हा हे आवश्यक झाले की, माणसाने चिंतन व मनन करावे. प्रेषित्वाचा दावा करणाऱ्या या व्यक्तीला खरोखर अल्लाहने पाठविले आहे काय? त्याच्यात ते उच्च गुण आढळतात ज्याने एखाद्या पैगंबरांना संपन्न असले पाहिजे? या साऱ्या गोष्टींचा विचार केल्यास मनुष्य विवश बनतो. एका तामिळ कवीचे कथन आहे, ‘ज्ञान व बोधच ईश्वर आहे.’ अल्लाहच ज्ञान व बोध आहे. वास्तविक ज्ञान व सत्य बोधामुळेच मानवाची ईश्वराशी ओळख होते. ईश्वरापासून बेपर्वा लोकांजवळ ज्ञानही नसते व बोधसुद्धा नसतो. मग ते आपल्या ज्ञानाचा

कितीही मोठा दावा का करीनात.

इस्लामचे एक अन्य वैशिष्ट्य असे आहे ज्याने त्याला अंगिकारले त्याने जात-पातीच्या भेदभावाला मूठमाती दिली.

मुदगुत्तूरमधील एक-दुसऱ्याचे डोके उडविणाऱ्यांनी जेव्हा इस्लाम ग्रहण केला तेव्हा इस्लामने त्यांना भाऊभाऊ बनविले. सर्व भेदभाव संपुष्टात आले. नीच जातीचे लोक नीच राहिले नाहीत तर सर्वजण प्रतिष्ठित व आदरणीय बनले. सर्व समान अधिकारांचे मालक बनून बंधुत्वाच्या बंधनात बांधले गेले.

इस्लामच्या या वैशिष्ट्याने मी अत्यंत प्रभावित झालो आहे. बर्नार्ड शॉ कोणत्याही प्रश्नाच्या पैलूंचा खोलवर परीक्षण करणारे व्यक्ती होते, त्यांनी इस्लामच्या तत्त्वांचे विश्लेषण केल्यानंतर सांगितले होते, ‘‘जगात शिल्लक व कायमस्वरूपी राहाणारा जर कोणता धर्म आहे तर तो इस्लाम होय.’’

पैगंबर मुहम्मद (स.) यांना आम्ही का एक महान पुरुष मानतो व आम्ही त्यांची प्रशंसा व मोठेपणाचे गुणगान का करतो?

इ. स. १९५७ मध्ये जेव्हा आम्ही मानवचिंतन जागृत करण्याचा आणि जनतेला त्यांच्या स्वाभिमानाची ओळख करून देण्याचा थोडाफार प्रयत्न करतो, तेव्हा किती विरोध होतो? चौदाशे वर्षांपूर्वी जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हा संदेश दिला की -

‘‘मूर्तींना ईश्वर बनवू नका’’ अनेक देवतांची पूजा करणाऱ्या लोकांदरम्यान उभे राहून त्यांनी ही घोषणा केली की, मूर्ती तुमचे उपास्य नाहीत. त्यांच्यापुढे नतमस्तक होऊ नका. केवळ एकाच सृष्टीकर्त्याची उपासना करा.’’

या घोषणेसाठी केवढ्या मोठ्या धैर्याची आवश्यकता होती? या संदेशाला किती विरोध झाला असेल?

विरोधाच्या वादळादरम्यान पैगंबर मुहम्मद (स.) संपूर्ण दृढतेने हा क्रांतिकारी संदेश देत राहिले. हे त्यांच्या महानतेचे फार मोठे प्रमाण होय. त्यांच्यातील या दृढतेचे अनुसरण आजसुद्धा इस्लाम धर्मांचे अनुयायी करतात.

इस्लामी जीवनपद्धती लोकांत ऐक्य निर्माण करते, त्यांच्यात जागृती आणते, बंधुभाव व प्रेमाचे संबंध निर्माण करते.

अन्य धर्म लोकांत पक्षपाताच्या भावनेला उत्तेजन देतात, एकाला दुसऱ्याशी लढवितात, येथपावेतो की पोलिसांना हस्तक्षेप करणे भाग पडते. याच्या उलट इस्लामी

जीवनसिद्धान्त आणि ही जीवनप्रणाली आपुलकी व प्रेमाच्या आधारे लोकांना संघटित करते.

धर्म व योग्य जीवनपद्धतीत अंतर असू शकत नाही. अंतर असणे त्या वेळी शक्य होते जेव्हा धर्माची कल्पना अपूर्ण व सीमित असते. येथपावेतो की असे समजले जावे की, धर्माचा जीवनाच्या सर्वसामान्य समस्या आणि त्याच्या इतर बाबींशी कोणताही संबंध नसतो.

सत्य धर्माला, जो खुद्द एक जीवनप्रणाली आहे, जर व्यावहारिक रूप दिले गेले तर त्यापासून लोकांना लाभच होईल, हानी नव्हे. यासाठी एक असे वातावरण निर्माण केले पाहिजे ज्यात ही जीवनप्रणाली स्वस्थपणे आपले कार्य करू शकेल व ज्यात ती लोकांना न्याय, आदर-सन्मान, सुख-शांती व ते सर्व काही देऊ शकेल ज्यांची त्यांना गरज आहे.

मानव वातावरणनिर्मिती करतो. जसे वातावरण असते सामान्यत: लोक त्याप्रमाणेच स्वत:ला तयार करतात. जनता असा विचार करीत नाही, की वातावरण एखाद्या जीवनपद्धतीला स्वस्थपणे क्रियान्वित होण्यासाठी संधी देतो किंवा नाही, ती तर मेंढराप्रमाणे डोळे झाकून चालते.

वातावरणाची दिशा योग्य आहे किंवा नाही. याचा सुगावा लावणारे लोक महान असतात, जेव्हा ते पाहतात की, वातावरणाची दिशा चुकीची आहे तेव्हा ते त्याच्या उलट दिशेने चालू लागतात. त्यांना याची पर्वा नसते कीं, ही उलट दिशा स्वीकारल्यामुळे त्यांना भयंकर नुकसान पोचू शकते. सत्य व योग्य जीवनपद्धतीला पूर्णपणे व्यावहारिक रूप देण्यासाठी ते विपरीत दिशेने चालण्याचा दृढनिश्चय करतात आणि त्या दिशेने चालू लागतात, येथपावेतो की चुकीच्या वातावरणाला एका स्वच्छ व मंगल वातावरणात बदलून टाकतात. कष्ट सहन करून व संकटांना बळी पडूनसुद्धा जे लोक सत्य मार्गावर चालण्याचे धाडस करतात, वास्तविकत: तेच लोक कर्तृत्ववान लोक आहेत. असलेच धैर्यवान लोक काळाशी टक्कर देत एका अशा वातावरणाची निर्मिती करतात ज्यात योग्य जीवनप्रणालीला व्यावहारीक रूप दिले जाऊ शकते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांची गणना अशाच महान व साहसी व्यक्तींमध्ये होते. एवढेच नव्हे तर त्यांची महानता मोठ्या व्यक्तींपेक्षा अधिक वृद्धिंगत होऊन समोर आली आहे.

अशा महान पुरुषांच्या शिकवणी देशात सार्वत्रिक केल्या पाहिजेत. या शिकवणी

सार्वत्रिक करण्यासाठी चांगले वातावरण हवे आणि चांगल्या वातावरणाच्या निर्मितीसाठी चांगल्या शिक्षणव्यवस्थेचे असणे आवश्यक आहे. चांगली शिक्षणव्यवस्था त्याच वेळी शक्य आहे जेव्हा शासन चांगले असेल. आम्ही चांगल्या शासनाची कल्पना तोपर्यंत करू शकत नाही जोपर्यंत चांगले शासक नसतील. हे चांगले शासक चांगल्या लोकांमधूनच मिळू शकतील. यावरून चांगल्या व पुण्यशील लोकांचे महत्त्व आणि त्यांच्या आवश्यकतेचा चांगल्या प्रकारे अंदाज लावला जाऊ शकतो. असले लोकच वास्तविकत: एखाद्या समाजाची खरी संपत्ती असतात, ज्यांच्यावर समाजाचे भविष्य अवलंबून असते. अशा लोकांची क्षती मानवतेचे सर्वांत मोठे नुकसान आहे.

इस्लाम हिऱ्यासमान आहे. हिऱ्याचा वापर लोक विभिन्न प्रकारे करतात. कोणी त्याला अंगठीत बसवितो तर कोणी दागिन्यात व कोणी त्याला विकून मिळालेली रक्कम भोग-विलासामध्ये उडवितो.

हिऱ्याचे महत्त्व अथवा लाभ किंवा त्याच्या क्षतीचा संबंध वास्तविकत: या गोष्टीशी आहे की, मनुष्य त्याचा कशाप्रकारे वापर करतो. आम्ही विचार केला पाहिजे की, हिऱ्यापेक्षा अधिक मौल्यवान व महत्त्वपूर्ण जीवनप्रणालीशी आमचा व्यवहार कसा आहे.

हा धर्म अत्याचारी व दुष्टांना सहयोग देईल काय? हा वंचितांचा हक्क दाबून टाकील काय? अथवा याच्या विपरीत हा धर्म पीडितांना व शोषित लोकांना मदत करील?

व्यावहारिक जगात तर पहिल्या प्रकारचे परिणामच समोर येत असतील, तर मग आम्ही इस्लामची कितीही प्रशंसा व बढाई मारीत राहिलो तर याचे काहीही महत्त्व नाही. होय, जर परिणाम दुसऱ्या प्रकारचे दिसत असतील तर लोक अवश्य असे मानू शकतात की, ही पद्धती जगासाठी अल्लाहचा कृपाप्रसाद ठरेल.

इस्लाम आपल्या सर्व सद्गुण व उज्ज्वलतेसह हिऱ्याप्रमाणे आजसुद्धा अस्तित्वात आहे. आता इस्लामच्या अनुयायींचे हे कर्तव्य आहे की, त्यांनी इस्लाम धर्माला सत्य स्वरूपात अंगिकारावे. अशा प्रकारे ते आपल्या पालनकर्त्यांची प्रसन्नता व खुशीही प्राप्त करू शकतात. गरीब व वंचितांच्या त्रासदायक समस्यासुद्धा सोडवू शकतात आणि मानवता भौतिक व आध्यात्मिक विकासाकडे जलद गतीने अग्रेसर होऊ शकते.

# इस्लाम : जगाच्या सुप्रसिद्ध विभूतींच्या दृष्टीत

आमच्या येथील विचारवंत अन्नादुराईनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना ज्या आदराच्या दृष्टीने पाहिले त्याचा उल्लेख आम्ही वर केलेला आहे. केवळ अन्नादुराईच नव्हे तर जगाच्या विभिन्न देशांतील विद्वान व विचारवंत या सर्वांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या महानतेचा स्वीकार केला आहे. नेपोलियनपासून इन्साइक्लोपीडिया ऑफ ब्रिटानिका (एक विश्वकोश) च्या संपादकापर्यंत सर्वांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत श्रद्धांजली प्रस्तुत केली आहे.

नेपोलियनने म्हटले होते, ''तो दिवस दूर नाही की जेव्हा सर्वच देशांचे राजकारणी मिळून दिव्य कुरआनच्या सिद्धान्तानुसार एकाच प्रकारच्या शासनाचा अंगिकार करतील. कुरआनचे सिद्धान्त व शिकवणी सत्यावर आधारित आहेत व मानवजातीला आनंद व सुस्थितीने संपन्न करणाऱ्या आहेत. म्हणून अल्लाहने पाठविलेले पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांच्यावर अवतरित झालेला ग्रंथ दिव्य कुरआनवर मला गर्व आहे व मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत श्रद्धांजली प्रस्तुत करतो.''

गांधीजी म्हणाले, ''मी दिव्य कुरआनचा अनेक वेळा लक्षपूर्वक अभ्यास केला. सत्य व अहिंसेची शिकवण त्यात पाहून मला फार आनंद झाला.''

डॉ. सॅम्युएल जॉन्सन आपल्या जगप्रसिद्ध पुस्तक 'ओरिएन्टल रिलीजन्स'मध्ये लिहितात, ''कुरआन गद्यही नाही आणि पद्यही नाही, तरीसुद्धा त्यात गद्याची ओजस्विताही आहे व पद्याचे सौंदर्यसुद्धा. तो इतिहासही नाही आणि कोणाचे जीवनचरित्रसुद्धा नाही, तरीसुद्धा आदेश व शिकवणीच्या दृष्टीने तो सर्वांत जास्त प्रभावशाली आहे. आदरणीय मूसा (अ.) यांना तौरात ग्रंथ एकाच वेळी मिळाला होता, परंतु कुरआन एकाच वेळी अवतरित झाला नाही व एकाच वेळी प्रस्तुतसुद्धा केला गेला नाही. प्लेटोच्या पुस्तकात सर्वेक्षण व अन्वेषणाच्या पद्धतीचा अवलंब केला गेला आहे. परंतु कुरआनची पद्धती व शैली खुद्द त्याची स्वत:ची आहे. ती एका आवाहनकर्त्याची पुकार आहे. विवेकाने परिपूर्ण, संघर्षाचे धैर्य व कृतीच्या चैतन्याने भरलेला ग्रंथ. आपल्या संदेशाच्या विरोधकांना आव्हान देणारा ग्रंथ, समदु:खीभाव व सहानुभूतीने त्यांना समजावून देणारा ग्रंथ, तो इतका ज्ञानपूर्ण व व्यापक ग्रंथ आहे की, प्रत्येक देश आणि सर्वकालीन लोक, जाणून किंवा अजाणपणे, मनाने अथवा अन्यमनस्कतेने त्याच्या शिकवणीच्या प्रभावात स्वत:ला ठेवण्यास विवश आहेत. त्याचा प्रतिध्वनी महालातही ऐकला जात आहे आणि वाळवंटातसुद्धा, शहरात ऐकला जात आहे आणि खेड्यातसुद्धा. कोणत्याही

भेदभावाविना प्रत्येकावर त्याची छाप पडत आहे.

सर्वप्रथम या ग्रंथाने आपल्या संदेशाचा अवलंब करणाऱ्यांच्या हृदयांना प्रेरित केले. त्यानंतर त्यांना एका सामूहिक आंदोलनात परिवर्तीत केले. हे आंदोलन एखाद्या वादळाप्रमाणे उठले आणि इराण व आशियाच्या विभिन्न देशांतून जाऊन दूरवर पोचले. तेथे ज्या निर्माणात्मक विचारधारा अस्तित्वात होत्या, त्यांना या आंदोलनाने आपल्यात समाविष्ट करून घेतले व अंधारात भटकणाऱ्या युरोपला ज्ञान व बुद्धिमत्तेची शिकवण दिली.''

दिव्य कुरआनचे प्रथम इंग्रजी भाषांतरकार रॉडवेल यांनी आपल्या भूमिकेत कुरआनची खालीलप्रमाणे प्रशंसा केली आहे -

''या ग्रंथाने अरबस्तानातील अज्ञानी, संस्कारहीन व असभ्य लोकांना अल्पावधीतच जगाचे नेतृत्व व शासन करण्यायोग्य बनविले, जणू एखाद्याने जादूची छडी फिरविली आणि अरबांत लगेच एक महान क्रांतीचा उदय झाला.''

प्रथम जानेवारी इ.स. १९४५ मध्ये सरोजिनी नायडू यांनी मुस्लिम इन्स्टिट्यूट हॉल ऑफ कलकत्तामध्ये आपली आदरांजली या शब्दांत वाहिली -

''दिव्य कुरआन शिष्टाचार व न्यायाचे घोषणापत्र आहे. स्वातंत्र्याचा चार्टर आहे. व्यावहारिक जीवनात सत्य व न्यायाची शिकवण देणारा महान ग्रंथ आहे. कुरआनशिवाय कोणताही अन्य धार्मिक ग्रंथ जीवनाच्या सर्वच बाबी व पैलूंची व्यावहारिक व्याख्या व सोडवणूक प्रस्तुत करीत नाही.''

जर्मनीचे विद्वान गटे म्हणाले,

''जेव्हा जेव्हा मी कुरआनचे पठन करतो तेव्हा मला नवनवीन अर्थांचा उकल होत जातो. हा ग्रंथ आपल्या वाचकाला हळूहळू आपल्याकडे आकर्षित करीत जातो आणि अन्ततः मनमस्तकावर आच्छादित होतो.''

प्रसिद्ध इतिहासकार गिब्नने या शब्दांत आपली श्रद्धा प्रकट केली आहे -

''एकेश्वरत्वाला स्पष्ट शब्दांत व्यक्त करणारा व मनावर एकेश्वरत्वाची छाप लावणारा महान ग्रंथ दिव्य कुरआन आहे.''

इन्सायक्लोपीडिया ऑफ ब्रिटानिकाचे संपादक लिहितात,

''जगात सर्वांत जास्त वाचला जाणारा व तोंडपाठ केला जाणारा ग्रंथ कुरआन आहे. ही विशेषता जगाच्या अन्य कोणत्याही धार्मिक ग्रंथाला प्राप्त नाही.''

# वेदांनीसुद्धा पैगंबर मुहम्मद (स.) संबंधी भविष्यवाणी केली आहे

पैगंबर मुहम्मद (स.) यांचा जन्म इ.स. सहाव्या शतकात अरबस्तानात झाला. परंतु याच्या फार पूर्वी त्यांच्या आगमनाची भविष्यवाणी वेदांमध्ये केली गेली आहे. एका सज्जनाकडून ही गोष्ट ऐकून मी याचा शोध केला. मग वेदांमध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनाची भविष्यवाणी पाहून मी आश्चर्यचकित झालो. पुराणमध्येसुद्धा पैगंबर मुहम्मद (स.) यांचा उल्लेख आहे. महान ऋषि व्यास यांच्या अठरा पुराणांपैकी एक पुराण 'भविष्य पुराण' आहे. त्याचा एक श्लोक असा आहे,

"एका दुसऱ्या देशात एक आचार्य आपल्या मित्रांसमवेत येतील, त्यांचे नाव महामद असेल. ते वाळवंटाच्या प्रदेशात येतील."

- भविष्य पुराण, अ ३२३, सू. ५ ते ८

स्पष्टपणे या श्लोक व सूत्रात नाव व स्थानाचा संकेत आहे. येणाऱ्या महान पुरुषाच्या अन्य खुणांचे वर्णन असे आहे -

"जन्मत: त्यांची खतना (सुन्ता) केलेली असेल. त्यांना जटा असणार नाही. ते दाढी ठेवतील. मांस खातील. आपला संदेश स्पष्ट शब्दांत प्रभावीपणे प्रसारित करतील. आपल्या संदेश मानणाऱ्या लोकांना ते मूसलाई (मुस्लिम)नावाने संबोधतील."

- अध्याय ३, श्लोक २५, सूत्र ३

हा श्लोक लक्षपूर्वक पाहा. खतना (सुन्ता) ची पद्धत हिंदुंमध्ये नव्हती. जटा भारतात धार्मिक चिन्ह होते. येणाऱ्या महापुरुष अर्थात पैगंबर मुहम्मद (स.) मध्ये ही सर्व लक्षणे स्पष्टपणे आढळतात. याशिवाय हा संदेश मानणाऱ्या लोकांसाठी मूसलाई हे नाव आहे हा शब्द मुस्लिम व मुस्लिमांकडे संकेत करतो.

अथर्ववेद अध्याय २० मध्ये आम्ही खालील श्लोक पाहू शकतो -

- "हे भक्तांनो! हे लक्षपूर्वक ऐका. प्रशंसा केला गेलेला, ज्याची प्रशंसा केली जाईल असा तो महामे ऋषि साठ हजार नव्वद लोकांदरम्यान येईल. ते वीस नर आणि माद्या उंटावर आरुढ होतील. त्यांची प्रशंसा व बढाई स्वर्गापर्यंत होईल. त्या महामे ऋषिचे सोन्याचे शंभर आभूषण असतील."

उंटावर बसणारा महामे ऋषि आम्हाला भारतात आढळत नाही. म्हणून हा संकेत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडेच केला गेला आहे. शंभर सोन्याच्या दागिन्यापासून

अभिप्रेत हबशा (ॲबिसीनिया देश) च्या परदेश गमनाला जाणारे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शंभर प्राणोत्सर्गी मित्र होत.

- ''दहा मोतीचे हार, तीनशे अरबी घोडे, दहा हजार गायी त्यांच्याकडे असतील.''

दहा मोत्यांच्या हारांचा संकेत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या त्या दहा मित्राकडे आहे, ज्यांना जगातच स्वर्गाची शुभवार्ता दिली गेली. बद्रच्या युद्धात भाग घेणाऱ्या ३१३ सहाबा (पैगंबरांचे सोबती) यांना ३०० अरबी घोड्यांची उपमा दिली गेली आहे. दहा हजार गायींपासून हे अभिप्रेत आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अनुयायींची संख्या फार मोठी असेल.

दिव्य कुरआन पैगंबर मुहम्मद (स.) यांना 'जगासाठी कृपा' या नावाने संबोधतो. ऋग्वेदातसुद्धा आहे -

''कृपेचे नाव प्राप्त करणारा. प्रशंसा केला गेलेला १० हजार सोबत्यांसमवेत येईल.''
- मंत्र ५, सूत्र २८

अशाच प्रकारे महामे व महामद या नावानेसुद्धा वेदांत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनाचा उल्लेख आहे.

# तुजसमान तूच

मुस्लिम असभ्य आहेत, हट्टी व शीघ्रकोपी आहेत. जुलमी व घमेंडखोर असतात. या गोष्टी सामान्यत: मुस्लिमेतर बंधुंमध्ये पसरलेल्या आहेत. जर याचा शोध घेतला गेला व जवळ जाऊन पाहिले तर एक दुसरेच सत्य सूर्यापेक्षा अधिक तेजस्वी होऊन डोळ्यांसमोर येते.

'इस्लाम' या शब्दाचा अर्थच मुळी शांती व सुरक्षा आहे. जेथपावेतो माझा अभ्यास आहे, नरमाई, आवेशांवर नियंत्रण व सहनशीलतेचा जर कोणी उत्तम नमुना आहे तर ते पैगंबर मुहम्मद (स.) हेच आहेत. तसे पाहिले तर सर्वच सदाचारी पुरुष व सुधारकगण उच्च गुणांनी सुसज्जित असतात, परंतु मानव इतिहासात पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासारखे सर्वगुणसंपन्न व्यक्तित्व कोठेही आढळत नाही, याची घोषणा मी हृदयतळापासून करतो.

पैगंबर मुहम्मद (स.) अरबस्तानचे शासक असूनदेखील आपले काम स्वत: करीत असत. आपले जोडे ते स्वत: दुरुस्त करीत. आपल्या कपड्यांना स्वत:च्या हाताने ठिगळ लावीत असत. जनावरांना आपल्या हाताने चारा देत असत व आपल्या हाताने धार काढीत असत. दूध पिणाऱ्या व दुधात आंघोळ करणाऱ्या शासकांना संपूर्ण जग जाणते, परंतु जनावरांची धार काढणारे पैगंबर मुहम्मद (स.) एकमात्र शासक होते.

दक्षिण भारतातील एक कथा आहे. एका ऋषीने वाइगई नदीची माती डोक्यावर वाहून नेली आणि त्यांनी हे काम मजुरीसाठी केले होते. परंतु जेव्हा ही गोष्ट राजाला कळाली तेव्हा ज्या व्यक्तीने त्या ऋषीच्या डोक्यावर माती दिली होती, त्याला राजाने कठोरपणे दंडित केले. परंतु आम्ही पाहतो की, मदीनाच्या मस्जिदचे निर्माणकार्य करणाऱ्या लोकांत पैगंबर मुहम्मद (स.) स्वत:देखील सामील होते. हे इतिहासाचे निराळेच उदाहरण आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे अंथरुण पांघरुण साधेच होते. चटई अथवा कातड्यावर ते झोपत असत आणि कधीकधी तर ते जमिनीवरच विश्रांती घेत असत. त्यांचे घरसुद्धा कच्चे व मातीचे बनलेले होते. खजुरीची पाने छपरासाठी वापरली होती. ते जगाचा त्याग करणारे संन्याशी नव्हते, तर तत्कालीन शक्तिशाली शासक होते, तरीसुद्धा हा साधेपणा व ही नम्रता पाहून मनाची विचित्र दशा होते.

सदैव हसतमुख चेहरा असलेले, न चिडणारे, न रागावणारे, न खदखदा हसणारे, प्रत्येक व्यक्तीच्या कामी पडणारे, प्रतिष्ठित चाल चालणारे, कुणाच्याही सलामची प्रतीक्षा

केल्याविना प्रत्येक व्यक्तीला पुढे जाऊन सलाम करणारे, वयस्करांना त्यांचा आदर म्हणूनच नव्हे तर लहानांना स्नेहाने प्रथम सलाम करणारे. एखादा याचना करणारा, मग तो दिव्य असो, तुडवलेला असो, दलित असो की जगाच्या दृष्टीने तुच्छ का असेना, त्याच्या हाकेला उत्साहाने, तत्परतेने व दया-भावनेने ओ देऊन त्याच्या सहाय्याला धावणारे. असे आहे महान व उच्च आचरण पैगंबर मुहम्मद (स.) यांचे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जीवनभर कोणाला झिडकारलेही नाही की कोणाला धिक्कारले नाही अथवा कोणाला शिवीगाळ केली नाही. अनेक महापुरुषांसंबंधी आम्हाला कल्पना आहे की, बाहेर ते दुसऱ्यासाठी नम्र स्वभावाचे, धैर्यवान व संयमी दिसतील, परंतु आपल्या मुलाबाळांत, आपल्या नोकरचाकर व आपल्या अधीन लोकांदरम्यान ते कठोर, धाकदपटशा करणारे व कटुवचनी असतात. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांची गोष्ट निराळी आहे. ज्याप्रमाणे ते दुसऱ्यांच्या दरम्यान राहत असत, तसेच ते मृदुल स्वभाव व सुशील आपल्या मुलाबाळांत, नोकरचाकर व अधीन लोकांच्या दरम्यानसुद्धा होते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या भेटीस येणारे जेव्हा हस्तांदोलनासाठी हात पुढे करीत तेव्हा त्यांचा हात धरून ते त्यांच्याशी वार्तालाप करीत असत. येणारी व्यक्ती जोपर्यंत आपला हात ओढून घेत नसे तोपर्यंत ते आपला हात तसाच पुढे ठेवीत असत. आपल्या सोबत्यांबरोबर जेव्हा ते चालत असत तेव्हा त्यांच्या हातात हात घालून चालत असत. प्रत्येकाला प्रेम व आदराने हाक देत असत. एखादा पैगंबरांशी कठोर शब्दांत बोलला तर ते धैर्याने वागत असत. ते लज्जेची प्रतिमूर्ती होते. कुलीन घराण्याच्या चारित्र्यसंपन्न कुमारिकेपेक्षा अधिक ते लज्जावान होते.

अशा महान पुरुषाला ज्या सौभाग्यशाली लोकांनी आपला नेता बनविले त्यांचेच नाव मुस्लिम आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अनुयायी लोकांत आजसुद्धा या गुणांची छाप आढळते. हे सर्व काही या पुण्यशील महान पैगंबरांमुळेच आहे.

# पैगंबरांची नम्रता व दृढता

अनेक धार्मिक गुरुंच्या जीवनात आम्हाला असे क्षणसुद्धा आढळतात की, ते अल्लाहच्या मदतीपासून निराश झालेले आहेत. हे सर्व लोक सदाचारी होते, परंतु कठीण स्थितीत कधीकधी त्यांच्या मुखातून असे शब्द निघत असत जणू अल्लाहने त्यांची साथ सोडली आहे.

या लोकांच्या जीवनात नरमी तर आढळते, परंतु त्याचबरोबर कठीण स्थितीत आपल्या तत्त्वांवर अढळ राहणे व ती दृढता दिसून येत नाही जी त्यांच्यापासून अपेक्षित आहे.

अरबी पैगंबरांचे वैभव तर पाहा. ते बोलण्यात जितके मृदुभाषी होते, संघर्षाच्या मैदानात ते तितकेच गरम होते, संकट व अडचणीत पर्वताप्रमाणे ते अटळ असल्याचे दिसतात.

पैगंबरांचे एकेश्वरत्वाचे आवाहन ऐकून रागाने भडकलेल्या लोकांचे एक प्रतिनिधीमंडळ पैगंबर मुहम्मद (स.) यांचे चुलते अबू तालिबकडे गेले व त्यांना बजावले की, एक तर त्यांनी आपल्या पुतण्याला समजावून सांगावे की त्याने आवाहन (निमंत्रण) करण्याचे सोडून द्यावे अथवा त्यांनी जातीमधून दूर व्हावे. आम्ही स्वत: मुहम्मदला पाहून घेऊ.

स्थितीच्या गांभीर्याने अबू तालिब चिंतित झाले. पैगंबर मुहम्मद (स.) यांना बोलाविले व कुरैशच्या इराद्याविषयी त्यांना सांगितले. मग प्रेमपूर्ण शब्दांत असा सल्ला दिला की, अशा परिस्थितीत तुम्ही थोडे नमते घ्या. अशा प्रसंगी खरे पैगंबर व महान पथ-प्रदर्शकाचे हे उत्तर मानवी दृढता आणि निश्चयाच्या मजबुतीच्या इतिहासातील एक वैभवशाली अध्याय होय.

''जर या लोकांनी माझ्या उजव्या हातात सूर्य व डाव्या हातात चंद्र आणून ठेवले तरीसुद्धा मी आपले प्रयत्न सोडणार नाही. मी आपल्या अखेरच्या श्वासापर्यंत हे आवाहन पोहचविण्यात कोणतीही कमतरता करणार नाही.''

विरोधकांनी न जाणो किती कष्ट पैगंबरांना दिले. केरकचरा त्यांच्यावर टाकला, त्यांच्यावर दगडांचा वर्षाव केला, नमाजच्या स्थितीत तर पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर उंटाच्या आतड्यासुद्धा घातल्या. त्यांच्या हत्येसाठी प्रत्येक टोळीच्या एक एक माणसाने नंग्या तलवारींसह त्यांच्या घराला घेरले.

अशा कठीण परिस्थितीमुळे त्यांच्यात अधिकच दृढता उत्पन्न झाली. त्यांचे पाय अजिबात डगमगले नाहीत.

रणभूमीत जेव्हा त्यांना आव्हान दिले गेले तेव्हा हाच मृदुल स्वभावी मनुष्य पूर्ण दृढतेसह पुढे सरसावीत असताना दिसतो. केवळ ३१३ शूर गडी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याबरोबर होते आणि या उलट विरोधकांची संख्या यापेक्षा कित्येक पटीने जास्त होती. पैगंबरांनी धैर्याने मुकाबला केला व विजयी झाले.

युद्धभूमीत पैगंबर मुहम्मद (स.) जखमीसुद्धा झाले. त्यांच्या गालावर खोलवर जखमसुद्धा झाली. त्यांचे दोन दात तुटले. एका खड्ड्यात ते पडले. तरीसुद्धा त्यांच्या मजबुती व दृढतेत तिळमात्र कमतरता आली नाही. मदीन्याला वेढा घातला गेला. भूक, निर्धनता व उपवासाचे तोंडसुद्धा पाहावे लागले, परंतु कोणत्याही परिस्थितीत ते निराश झाले नाहीत. प्रत्येक स्थितीत आशापूर्ण व कठीणतम स्थितीत ते दृढतेचे पर्वत सिध्द झाले.

अशी तर त्या महान पैगंबरांची स्थिती होती. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सोबत्यांची स्थितीसुद्धा अशीच होती. हे लोक कित्येक अत्याचारांना बळी पडले. त्यांची टिंगल उडविली गेली. त्यांची चेष्टा केली गेली. त्यांना कोरडे ओढले गेले. तापलेल्या वाळूवर त्यांना झोपविले गेले. परंतु या सर्व स्थितीत पैगंबरांचे हे सोबती पूर्ण शक्तीसह सत्य मार्गावर टिकून राहिले.

एकेश्वरत्व व एका ईश्वरावर विश्वास त्यांच्या दृढतेने स्पष्ट होत होता. हे लोक आपल्या अंतिम श्वासापर्यंत आपल्या तत्त्वांवर टिकून राहिले. प्राण गेले परंतु हे आपल्या तत्त्वापासून ढळले नाही.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या अनुयायांना जेथे मृदुल स्वभाव बनण्याची शिकवण दिली तेथे त्यांना लवचीकपणा सोडून व्यवहार करण्याचीसुद्धा शिकवण दिली. पैगंबर आणि त्यांच्या साथीदारांवर विरोधकांनी अनेक अत्याचार केले. परंतु आम्ही पाहतो की, मक्काविजय प्राप्त करून जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांचे साथीदार विजयी म्हणून मक्का शहरात प्रवेश करीत होते, तेव्हा त्यांच्यावर विजयाच्या मदही चढलेला नव्हता की त्यांच्या मनात सुडाची भावनासुद्धा आली नव्हती. या उलट जगाने पाहिले की, ते विनम्रतेने इतके नतमस्तक झाले होते आणि त्यांच्या दाढीचे केस उंटाच्या मदारला स्पर्श करीत होते.

कुरैशचे अनेकेश्वरवादी लोक या विचाराने थरथर कापत होते की, आम्ही या

लोकांवर इतके भयंकर अत्याचार केले आहेत, आज आमच्याशी कसा व्यवहार होईल? त्या वेळी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या तोंडातून हे प्रेमपूर्ण शब्द मोत्याप्रमाणे झडत होते

''लोकहो! आज तुम्हावर सूड उगवला जाणार नाही, अल्लाहने तुम्हाला क्षमा करावी, तोच दयावान व कृपाशील आहे. आज तुम्ही सर्वजण स्वतंत्र आहात.''

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या हुतात्मा चुलत्याचे काळीज काढणाऱ्याला व ते काळीज चावणाऱ्या स्त्रीला क्षमा केली. मानव इतिहास अशा प्रकारचे एखादे उदाहरण सादर करू शकेल काय?

किती महानता व किती श्रेष्ठतेची गोष्ट आहे ही!

# पावित्र्य व स्वच्छता

अनभिज्ञ लोकांत इस्लाम आणि मुस्लिमांसंबंधी अनेक गैरसमज आढळतात. त्यांचा एक गैरसमज असाही आहे की, मुस्लिमांत पावित्र्य व स्वच्छतेला कोणतेही महत्त्व नाही. आम्ही अशा सर्व बंधुंना सांगू इच्छितो की, सर्वाधिक पावित्र्य आणि स्वच्छतेची शिकवण देणारा जर कोणता धर्म असेल तर तो केवळ इस्लाम आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पद्धतीनुसार जर बाह्य व आंतरिक पावित्र्य व स्वच्छता अवलंबिली तर संपूर्ण जग स्वच्छतेचा नमुना बनेल.

इस्लाममध्ये दररोज पाच वेळची नमाज अनिवार्य ठरविली गेली आहे आणि नमाज स्वच्छता व शुचिर्भूततेशिवाय अदाच होत नाही. स्वच्छता व शुचिर्भूततेला इस्लामी परिभाषेत 'तहारत' म्हणतात.

'तहारत'चे तीन प्रकार आहेत (१) शरीराची स्वच्छता, (२) कपड्यांची स्वच्छता आणि (३) जागेची स्वच्छता.

लघवी व शौचानंतर शरीराला अत्यंत स्वच्छ ठेवण्याचे शिकवण हा धर्म देतो. लघवीनंतर स्वच्छेतसाठी विटेचा तुकडा व पाण्याच्या वापरावर भर देतो.

खालील ठिकाणी शौच व लघवी करण्यास मनाई करतो. रस्ता, तलाव व नदीचे घाट, वृक्षाची सावली, ईदगाह, मस्जिद, कब्रस्तान व सार्वजनिक स्थळे वगैरे.

या बाबतीत उभे राहून लघवी करणे, पाण्यात लघवी वगैरे करणे किंवा वाहनावरून शौचादि करण्यास मनाई केली गेली आहे. ही मनाई विशेषत: पावित्र्य व स्वच्छतेला दृष्टीसमोर ठेऊन केली गेली आहे.

इस्लाममध्ये पावित्र्य व स्वच्छतेकडे किती अधिक लक्ष दिले गेले आहे याची कल्पना आपण या गोष्टीवरून करू शकता की, इस्लामने आदेश दिला आहे की, डुक्कर आणि कुत्रा यासारख्या अदिव्य जनावरांच्या तोंडाची लाळ वगैरे जर एखाद्या भांड्याला लागली तर ते भांडे चांगल्या प्रकारे घासून धुवून स्वच्छ केले पाहिजे.

अशाच प्रकारे जर कपडे अथवा शरीराला रक्त, पू आणि घाण वगैरे लागल्यास ते धुवून स्वच्छ केले पाहिजे. तसेच दूध पिणाऱ्या बालकानेसुद्धा लघवी केल्यास पाण्याने शरीर व कपडे धुवून स्वच्छ करणे आवश्यक आहे.

नमाजच्या अटीत ही गोष्टसुद्धा सामील केली गेली आहे की, नमाज अदा करण्याची जागा, मुसल्ला (ज्या कापडावर नमाज पढतो) नमाज पढणाऱ्याचे कपडे आणि त्याचेसुद्धा

शुचिर्भूत असणे आवश्यक आहे. नमाजीसाठी हे आवश्यक आहे की, नमाजपूर्वी त्याने वुजू (हात, पाय, तोंड वगैरे धुणे) करावा आणि जर स्नानाची आवश्यकता असेल तर स्नान अवश्य करावे.

स्नानात हेसुद्धा आवश्यक आहे की, त्याने चूळ भरावी व गुळणीसुद्धा करावी. नाकात पाणी घालून ते चांगल्या प्रकारे स्वच्छ करावे आणि मग संपूर्ण शरीरावर पाणी ओतून अंघोळ करावी.

वुजूमध्ये चूळ भरतात व नाकात पाणी घालून स्वच्छ करतात, तोंड व हात पाय धुतात आणि ही सर्व कामे तीन-तीन वेळा करतात.

हात भिजवून डोके, मानेवर व कानात फिरवतात. यासंबंधी (मिसवाक) दात घासण्याच्या लाकडी कांडीच्या वापराचीसुद्धा ताकीद केली गेली आहे, ह्याचे मोठे लाभ सांगितले आहेत.

नमाजसाठी दररोज पाच वेळा वुजू करावा लागतो. आता आपण स्वत:च समजू शकता की, इस्लाममध्ये स्वच्छतेकडे किती लक्ष पुरविले गेले आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) स्वत: स्वच्छतेकडे विशेष लक्ष देत असत. दात स्वच्छ करण्यासाठी त्यांची लाकडी कांडी सदैव त्यांच्या उशीखाली असे. सर्वत्र थुंकणे त्यांना पसंत नव्हते. जर एखाद्याने चुकीच्या जागी थुंकी टाकली तर ते स्वत: पुढे जाऊन ती थुंकी स्वच्छ करीत असत. ते आपल्या राहण्याची जागा आरशासारखी स्वच्छ ठेवीत असत. त्यांचे कपडे साधे असत, परंतु अगदी स्वच्छ.

''पावित्र्य व स्वच्छता श्रद्धेचे (अल्लाहवरील विश्वास) अंश आहेत.'' हे पैगंबरांचे कथन आहे.

# इस्लाममध्ये स्त्रीचे स्थान

इस्लाम आणि मुस्लिमांसंबंधी ज्या गैरसमजुती आढळतात, त्यांच्यापैकी काही गैरसमजुती स्त्रियांच्या संबंधाने आहेत.

इस्लामपूर्वी सामान्यत: प्रत्येक समाज व प्रत्येक सोसायटीत स्त्रियांना हीन समजले जात असे. त्यांचा अपमान केला जात असे आणि तऱ्हेतऱ्हेच्या अत्याचारांचे त्यांना लक्ष्य बनविले जात असे.

- भारतीय समाजात पतीचा मृत्यू झाल्यास पतीच्या प्रेताबरोबर पत्नीलासुद्धा जिवंत जाळले जात असे.
- चीनमध्ये स्त्रीच्या पायात आखुड लोखंडी बूट घातले जात असत.
- अरबस्तानात मुलींना जिवंत पुरले जात असे.

इतिहास साक्षी आहे की, या अत्याचाराविरुद्ध आवाज उठविणारे सुधारक अलीकडच्या युगात जन्मले आहेत, परंतु या सर्व सुधारकांपूर्वी शेकडो वर्षे अरबस्तानात पैगंबर मुहम्मद (स.) स्त्रियांचे हितचिंतक असल्याचे दिसते व ते स्त्रियांवर केल्या जाणाऱ्या अत्याचारांचा बिमोड करतात.

स्त्रियांच्या अधिकारांचे ज्ञान नसलेल्या अरब समाजात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्त्रीला पुरुषाबरोबरचा दर्जा दिला. स्त्रीचा वारसासंपत्तीत कोणताही हक्क नव्हता. पैगंबरांनी वारशात स्त्रीचा हक्क निश्चित केला. स्त्रीचे हक्क व अधिकार सांगण्यासाठी दिव्य कुरआनमध्ये निर्देश उतरविले गेले आहेत.

आई-वडील व अन्य नातेवाईकांच्या संपत्तीत स्त्रियांनासुद्धा वारसा घोषित केले गेले आहे. आज सभ्यतेचा राग अलापणाऱ्या अनेक देशांत स्त्रीला ना वारसासंपत्तीचा अधिकार आहे आणि ना मतदान करण्याचा. इंग्लंडमध्ये स्त्रीला मतदानाचा अधिकार इ.स. १९२८ मध्ये पहिल्यांदा देण्यात आला. भारतीय समाजात स्त्रीला वारसासंपत्तीत हक्क गत काही वर्षांत प्राप्त झाला.

परंतु आम्ही पाहतो की, आजपासून चौदाशे वर्षांपूर्वीच हे सर्व हक्क आणि अधिकार पैगंबरांनी स्त्रियांना बहाल केले होते. किती महान उपकारकर्ते होते पैगंबर मुहम्मद (स.)!

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीत स्त्रियांच्या हक्कावर विशेष भर दिला गेला आहे. त्यांनी ताकीद केली की, लोकांनी या कर्तव्यापासून गाफिल होऊ नये आणि न्यायसंगत रीतीने स्त्रियांचे हक्क अदा करीत राहावे. पैगंबरांनी हासुद्धा आदेश दिला आहे

की, स्त्रीला मारझोड करू नये.

स्त्रियांशी कसा व्यवहार करावा या बाबतीत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या वचनांचे अवलोकन करा.

१. आपल्या पत्नीला मारणारा सदाचारी नाही.

२. तुमच्यापैकी सर्वश्रेष्ठ मनुष्य तो आहे जो आपल्या पत्नीशी चांगला व्यवहार करतो.

३. स्त्रियांशी चांगल्या प्रकारे व्यवहार करण्याची अल्लाह आज्ञा देतो, कारण त्या तुमच्या आई, बहिणी व कन्या आहेत.

४. आईच्या पायाखाली स्वर्ग आहे.

५. कोणत्याही मुस्लिमाने आपल्या पत्नीशी घृणा करू नये. जर तिची एखादी सवय वाईट आहे तर तिच्या दुसऱ्या चांगल्या सवयीकडे पाहून पतीने प्रसन्न राहिले पाहिजे.

६. आपल्या पत्नीशी दासीसमान व्यवहार करू नका. तिला मारूही नका.

७. जेव्हा तुम्ही खाल तेव्हा आपल्या पत्नीलासुद्धा खाऊ द्या. जेव्हा तुम्ही वस्त्र परिधान कराल तेव्हा तिलाही कपडे द्या.

८. पत्नीला टोमणे मारू नका. तोंडावर मारू नका. तिचे मन दुखवू नका. तिला सोडून जाऊ नका.

९. पत्नी आपल्या पतीच्या जागी सर्व अधिकारांची मालकीण आहे.

१०. आपल्या पत्नींशी जे सद्वर्तन करतील तेच तुमच्यापैकी सर्वांत चांगले आहेत.

इतके सर्व अधिकार प्रदान करून स्त्रीला अगदी मोकाट सोडले नाही तर तिच्यावरसुद्धा काही बंधने घातली आहेत-

१. स्त्रीने अशा प्रकारे राहावे की जेव्हा तिचा पती तिला पाहील तेव्हा त्याने प्रसन्न व्हावे.

२. सुशील पत्नी मिळणे अमूल्य संपत्तीसमान होय.

३. जी पत्नी दररोज पाच वेळेची नमाज अदा करते, रमजानचे रोजे करते आणि आपल्या पतीची आज्ञा पाळते व आपल्या शीलाचे रक्षण करते, अशा स्त्रीने स्वर्गात हवे त्या मार्गाने प्रवेश करावा.

४. जगाच्या सर्व दौलतीपेक्षा अधिक मौल्यवान गोष्ट सुशील पत्नी होय.

अशा प्रकारे पैगंबरांनी स्त्रियांना अधिकारही दिले आणि त्यांना त्यांच्या कर्तव्यापासूनसुद्धा खबरदार केले.

एखाद्याला अशी शंका असू शकेल की, स्त्रियांना इतके जास्त अधिकार प्रदान करणाऱ्या इस्लाममध्ये बहुपत्नित्वाला का परवानगी आहे? हा स्त्रियांवर उघड अन्याय नाही काय? या बाबतीत आम्हाला इतिहास, पुरुषाचा स्वभाव व जीवनाच्या व्यावहारिक प्रश्नांना समोर ठेवले पाहिजे.

हिंदुस्थानातील दशरथ राज्याच्या अनेक पत्नी होत्या. अशाच प्रकारे आम्ही श्रीकृष्णाला रुक्मिणी, सत्यबा आणि राधेशिवाय असंख्य गोपींच्या दरम्यान पाहतो. हल्ली स्त्रियांशी मरगनसारख्या देवाला आम्ही भोगविलास करताना पाहतो.

या तर होत्या प्राचीन काळ व पुराणाच्या गोष्टी आता ऐतिहासिक घटना घ्या.

- मोठमोठ्या राजांकडे एकापेक्षा अधिक पत्नी असत.
- तामिळनाडूतील कट्टा बम्मनच्या घरी अनेक पत्नी होत्या.
- आजसुद्धा काही राजकीय पुढाऱ्यांच्या अनेक पत्नी आहेत.

इस्लामपूर्वी अरबस्तानात पत्नींच्या संख्येवर कोणतेही बंधन नव्हते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पुरुषाचा स्वभाव आणि व्यावहारिक गरजांचा विचार करून या असीम संख्येला चारपर्यंत सीमित केले.

इस्लामपूर्वी अरब जगतात विवाहाचा कोणताही विशेष नियम व सिद्धान्त नव्हता. समूहांत व टोळ्यांत पत्नी व दासी ठेवण्याचा आम रिवाज होता. अशाच प्रकारे घटस्फोटावरसुद्धा कोणतेही बंधन नव्हते. ज्याला जेव्हा वाटेल तेव्हा त्याने घटस्फोट द्यावा. अशा स्थितीत सुधारणा करण्यासाठी अल्लाहकडून निर्देश आले. पत्नींची संख्या सीमित केली गेली आणि तलाकसंबंधी योग्य नियम व शिष्टाचारांच्या पालनाची आज्ञा दिली गेली. दिव्य कुरआनमध्ये सांगितले गेले -

''तुम्हाला जर शंका असेल की, अनाथ मुलांचे पालनपोषण विवाह केल्याशिवाय होऊ शकणार नाही, तर आपल्या आवडीच्या दोन, तीन किंवा चार स्त्रियांशी तुम्ही विवाह करु शकतात. (जर तुम्हाला अशी शंका असेल की, त्यांच्याशीसुद्धा तुम्ही न्याय करू शकणार नाही, तर) एका पत्नी अथवा दासीवर संतुष्ट राहा. अन्यायापासून वाचण्यासाठी ही सुलभ पद्धत होय.'' *(दिव्य कुरआन, ४ : ३)*

दिव्य कुरआनच्या या आदेशात ज्या विवेकसंपन्न व कल्याणकारी गोष्टी आहेत

त्यांचा विचार करा. न्यायाने व खरेपणाने पत्नीशी वागा. बहुपत्नित्वाची परवानगीही आहे व त्याचबरोबर अन्यायापासून वाचण्यासाठी ताकीदसुद्धा. सर्व पत्नींशी न्याय करणे शक्य नसेल, तर एकच निवाह करण्यावर भर दिला गेला आहे.

पुरुषाला केव्हाही आपली कामवासना तृप्त करण्याची आवश्यकता भासू शकेल. ते अशासाठी की त्याला निसर्गाने प्रत्येक स्थितीत सदैव सहवासायोग्य बनविले आहे. याउलट स्त्रियांची गोष्ट यापेक्षा निराळी आहे.

मासिक पाळीच्या काळात, गर्भावस्थेत (नऊ-दहा महिने) प्रसुतीनंतरचे काही महिने स्त्री यायोग्य असत नाही की, पतीने तिच्याशी संभोग करू शकावे. सर्वच पुरुषांपासून ही अपेक्षा बाळगणे योग्य ठरणार नाही की, त्यांनी संयम व नियंत्रणाने वागावे व जोपर्यंत त्यांच्या पत्नी यायोग्य होत नाहीत की, त्यांनी त्यांच्याजवळ जावे, तोपर्यंत त्यांनी कामवासनेवर नियंत्रण राखावे. पुरुषाने धर्मसंमत पद्धतीने आपली गरज पुरी करू शकावे. म्हणून हे आवश्यक आहे की, त्यासाठी मार्ग शोधले जावेत आणि अशी अडचण ठेवली जाऊ नये की, त्याला धर्मनिषिद्ध मार्गावर चालणे भाग पडावे. पत्नी तर त्याची एक असावी आणि रखेल स्त्रियांचे काही बंधन नसावे. यामुळे समाजात जी घाण पसरेल व ज्या तऱ्हेने आचरण व चारित्र्य खराब होईल, त्याची कल्पना करणे काही कठीण नाही.

व्यभिचार व दुराचाराला निषिद्ध ठरविणारा व बहुपत्नित्वाची कायदेशीर परवानगी देणारा बुद्धिसंगत धर्म इस्लाम आहे. एकापेक्षा अधिक विवाहांना मर्यादित रूपात परवानगी देण्यात वास्तविकत: इस्लामने पुरुष व स्त्रीची शारीरिक रचना, त्यांची मानसिक स्थिती आणि व्यावहारिक गरजा या पुरेपूर लक्षात ठेवल्या आहेत. अशा प्रकारे आमच्या दृष्टीने इस्लाम पूर्णपणे एक वैज्ञानिक धर्म सिद्ध होतो. हे एक असले सत्य आहे ज्यावर माझा दृढ व अटळ विश्वास आहे.

# इस्लामचा प्रचार तलवारीने झाला काय ?

असे सांगणे की, इस्लामचा प्रसार तलवारीच्या जोरावर केला गेला, केवळ एक असा आरोप आहे जो पूर्णपणे गैरसमजुतीवर आधारित आहे. या दृष्टीनेसुद्धा सत्याचे परीक्षण करूया आणि योग्य निर्णयाप्रत पोचण्याचा प्रयत्न करूया.

ख्रिस्ती धर्माचा व इस्लामचा प्रचार प्रारंभिक काळात गुप्तपणे केला गेला. आदरणीय ईसा मसीह (येशू ख्रिस्त) यांच्यानंतर ख्रिस्ती धर्माचा प्रचार त्यांच्या अनुयायींनी केला. परंतु इस्लामचा प्रचार काही दिवसापर्यंत गुप्तपणे झाला, त्यानंतर उघडउघड त्याच्या प्रचाराची आज्ञा झाली.

इस्लाममध्ये बळजबरीला कोणतेही स्थान नाही, याची स्पष्ट घोषणा केली गेली आहे. सांगितले गेले,

''धर्माच्या बाबतीत कोणतीही बळजबरी नाही.'' *(दिव्य कुरआन, २:२५६)*

कोणीतरी असे म्हणू शकेल की, जर गोष्ट अशी आहे तर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी युद्धे का केली आणि त्यांना तलवार का उचलावी लागली? सत्य असे आहे की, पैगंबरांनी जी युद्धे केली त्यांना आक्रमक युद्धे म्हणता येणार नाही. पैगंबरांनी जी युद्धे केली ती सुरक्षात्मक होती. मक्कावासी मदीनेतील इस्लामी राज्य नष्ट करण्याची योजना तयार करून निघाले होते. हे मदीना तेच शहर आहे ज्याने पैगंबरांना आश्रय दिला होता. इस्लामी जीवनपद्धती नष्ट करण्यासाठी कुरैश अनेकेश्वरवादी लोकांनी जेव्हा हिंसात्मक कारवाई केली तेव्हा पैगंबरांना त्यांच्याशी संघर्ष करावा लागला. इतिहासातील नंतरच्या युगात मुस्लिम शासकांनी जी युद्धे केली त्यांचा इस्लामशी काडीचासुद्धा संबंध नाही.

हिंदू राजा रामचंद्राने जावा व सुमात्रावर जी सैन्यासह चढाई केली, त्याच्या परिणामस्वरूप आजसुद्धा तेथे हिंदू-संस्कृतीचा प्रभाव आढळतो. परंतु यावरून हा निष्कर्ष काढणे योग्य ठरणार नाही की, राजा रामचंद्रांनी हिंदू धर्माच्या प्रसारासाठी फौज पाठविली होती.

युरोपच्या ख्रिश्चनांनी फौजा पाठविल्या आणि पौर्वात्य देशांत आपले साम्राज्य स्थापित केले. या साम्राज्यात ख्रिश्चन धर्माचा प्रचार झाला. परंतु आपण असे म्हणू शकतो काय की, या देशात ख्रिस्ती धर्माचा प्रसार तलवारीच्या जोरावर झाला. फौजा तर सामान्यपणे मुलुखगिरीसाठी असतात. मग ज्या देशात ज्या लोकांचे राज्य स्थापित होते, त्या शासकांचे अनुकरण तेथील जनता करू लागते आणि त्यांच्या धर्मांचा अवलंब करू लागते.

हिंदूच्या एक पंथ समनर पंथ आहे. या पंथाच्या लोकांची सत्ता जेव्हा तामिळनाडूत प्रस्थापित झाली, तेव्हा तेथे समनर पंथाची खूप उन्नती झाली. हिंदुस्थानात जेव्हा बुद्धांची सत्ता होती तेव्हा तेथे बुद्धमताचा प्रसार झाला. अशाच प्रकारे जेव्हा शैवपंथी हिंदू शासक आले तेव्हा या पंथाला लोकप्रियता प्राप्त झाली. यावरून हे लक्षात येते की, 'जसा राजा तशी प्रजा' सारखीच गोष्ट त्या वेळी होती. नाहीतर धर्मप्रचाराची या शासकांना आवडही नव्हती आणि या कार्यासाठी त्या शासकांनी कधी युद्धही केले नाही.

इतिहासात आम्हाला अशी कोणतीही घटना आढळत नाही की, एखाद्याने इस्लाम धर्म स्वीकारण्यास नकार दिला आणि त्याने केवळ इस्लाम धर्म स्वीकारला नाही म्हणून त्याला ठार केले गेले असावे, परंतु कॅथॉलिक व प्रोटेस्टंट यांच्यातील संघर्षात धर्माच्या नावावर मोठ्या प्रमाणावर रक्तपात झाला. लांब कशाला जायचे, तामिळनाडूचाच इतिहास पाहा. मदुराईत ज्ञान समुद्राच्या काळात ८००० समनर मताच्या अनुयायांना सुळावर दिले गेले, हा आमचा इतिहास आहे.

अरबस्तानात पैगंबर मुहम्मद (स.) शासक होते तेव्हा तेथे यहूदीसुद्धा राहत असत आणि ख्रिश्चनसुद्धा, परंतु पैगंबरांनी त्यांच्यावर कोणतेही अत्याचार केले नाहीत.

हिंदुस्थानात मुस्लिम शासकांच्या काळात हिंदू धर्म अवलंबिण्यास व त्याप्रमाणे चालण्यास पूर्ण मुभा होती. इतिहास साक्षी आहे की, या शासकांनी मंदिराचे रक्षण व त्यांची देखरेख केली आहे.

मुस्लिमांची चढाई जर इस्लामच्या प्रसारासाठी असती तर दिल्लीच्या मुस्लिम सुलतानाविरुद्ध मुस्लिम बाबरने कदापि सैनिकी चढाई केली नसती. मुलुखगिरी त्या काळातील सर्वमान्य राजकारण होते. मुलुखगिरीचा कसलाही संबंध धर्मप्रचाराशी असत नाही. अनेक मुस्लिम धर्मपंडित आणि साधू-संत इस्लामच्या हिंदुस्थानात आलेले आहेत आणि त्यांनी आपल्या परीने इस्लामच्या प्रचाराचे कार्य येथे केले. त्यांचा मुस्लिम शासकांशी काहीही संबंध नव्हता. याचा पुरावा म्हणून नागोरमध्ये दफन झालेले माननीय शाहुल हमीद व अजमेरचे शाह मुईनुद्दीन चिश्ती वगैरेची नावे घेता येतील.

इस्लाममध्ये त्यांच्या तत्त्वज्ञान व नैतिक शिकवणीच्या दृष्टीने फार मोठे आकर्षण आहे आणि हेच कारण की, लोकांची हृदये आपण होऊन त्यांच्याकडे आकर्षित होतात. मग असल्या धर्माला आपल्या प्रचारासाठी तलवार उचलण्याची गरजच कुठे भासते?

# कम्युनिझमपेक्षा चांगला व श्रेष्ठ इस्लाम आहे

भांडवलशाहीच्या पाठीचा कणा मोडणाऱ्या दोन विचारसरणी आहेत, एक कम्युनिझम व दुसरी इस्लाम.

येथील कम्युनिस्टांपैकी काहींनीच 'दास कॅपिटल' चा गाढा अभ्यास केला असेल. मार्क्सचा एक सिद्धान्त आहे ज्याचे नाव 'अतिरिक्त मूल्य' असे आहे. याच सिद्धान्ताचे विश्लेषण मार्क्सने ग्रंथाच्या तीन बृहद्खंडात केले आहे.

कम्युनिझमचा असा दावा आहे की, भांडवलदार आपले भांडवल लावतो, मजूर आपल्या परिश्रमाने ते भांडवल फायद्याच्या रूपाने वाढवितो. हा फायदा मूळ भांडवलापेक्षा अधिक असतो, या जादा प्राप्तीपासून भांडवलदार आणखी एक कारखाना सुरू करतो आणि जनतेचे शोषण करतो. असा दावा केल्यानंतर कम्युनिझम पुढे सरसावतो आणि भांडवलशाहीची मूळ शक्ती अर्थात हे 'अतिरिक्त मूल्य' समाप्त करण्याचा निश्चय करतो. तो भांडवलशाही समाप्त करून उत्पन्नाच्या सर्व साधनांचे राष्ट्रीयीकरण करतो.

विचार करण्याजोगी गोष्ट अशी आहे की, उद्योगांचे राष्ट्रीयीकरण करणे ही प्रश्नांची सोडवणूक आहे काय? राष्ट्रीयकृत उद्योगातसुद्धा 'अतिरिक्त मूल्य' अथवा लाभाचा प्रश्न समोर येईल. प्रश्न असा आहे की, या लाभाचे काय करावे? आणि हेसुद्धा पाहिले पाहिजे की, प्रत्यक्षपणे या लाभाची कशी विल्हेवाट लावली जात आहे?

घडते असे की, प्रथमत: उद्योगांचे राष्ट्रीयीकरण केले जाते. मिळणाऱ्या लाभापैकी काही भाग मजुरांत वाटला जातो, उरलेल्या जनतेसाठी काहीही नाही.

एखाद्या उद्योगाच्या लाभापैकी केवळ त्यात काम करणाऱ्या मजुरांनाच त्याचा हिस्सा मिळतो, दुसऱ्या कारखान्यात काम करणारे मजूर अथवा देशातील गरीब जनतेचा त्यात काहीही वाटा नसतो. राष्ट्रीयीकरणाचा असा अर्थ लावणे योग्य नव्हे, तर तो फायदा राष्ट्रातील सर्व लोकांत वाटला गेला पाहिजे.

कम्युनिस्ट शासन कायद्याच्या बळावर लाभ हिसकावून घेऊन दुसऱ्यांना देते. या उलट इस्लाममध्ये अतिरिक्त मूल्य अथवा लाभ दुसऱ्यासाठी खर्च करण्यास प्रोत्साहन दिले गेले आहे आणि त्याची ताकीद दिली जाते. या कृतीच्या पाठीमागे मूळ प्रेरक शासनाचा दबाव नाही तर श्रद्धेची शक्ती असते.

कम्युनिस्ट देशात उद्योगाचेच राष्ट्रीयीकरण होते. लाभाच्या वाटपाची जी काही व्यवस्था असते, यांच्यातच असते, उरली ती संपत्ती जी लोकांच्या ताब्यात असते, त्यापासून होणाऱ्या लाभाच्या वितरणाची कोणतीही कल्पना नाही आणि प्रत्यक्षपणे तसली कोणतीही व्यवस्था ठेवली गेली नाही. परंतु इस्लाम लोकांच्या प्राप्तीमधील

अतिरिक्त संपत्तीसुद्धा दुसऱ्यासाठी खर्च करण्याची ताकीद देतो. या अतिरिक्त संपत्तीचाच भाग जनकल्याणासाठी वेगळा काढण्यास आणि खर्च करण्यास 'जकात' म्हणून नाव दिले आहे.

अरबी भाषेत 'जकात' शब्दाचा अर्थ 'शुद्धिकरण' व 'पावित्र्य' आहे. आपल्या प्राप्तीपैकी एक भाग काढणे जकात होय. अर्थात जकात देऊन एखादा मनुष्य आपल्या मालाला (संपत्तीला) पावित्र्य प्रदान करतो. असे न केल्यास संपूर्ण संपत्ती अदिव्य बनते. असली उत्तम शिकवण जगात फक्त इस्लामनेच दिली आहे.

एखादा असा प्रश्न करील की, आपल्या संपत्तीतून कल्याणासाठी खर्च करण्याची शिकवण तर धर्माची एक शिफारस आहे. जर एखाद्या श्रीमंताने इच्छिले तर त्याला धोका देण्यापासून कसे रोखले जाईल?

या प्रश्नाचे उत्तर आम्हाला इतिहासात सापडते. जकात न देणाऱ्यांच्या विरुद्ध इस्लामचे सर्वप्रथम खलीफा माननीय अबू बकर सिद्दीक (रजि.) यांनी तलवार उचलली होती. वास्तविकत: जकात देण्यास नकार देणारे हे लोक बाह्यत: मुस्लिम आणि इस्लामचे अनुयायी होते. इस्लाम धर्माला मानणारे व पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर विश्वास ठेवणारे आणि नियमितपणे नमाज अदा करणाऱ्या लोकांच्या विरुद्ध ही तलवार उचलली होती. ज्या अपराधाचे हे गुन्हेगार होते तो एक भयंकर अपराध होता. अल्लाहवर श्रद्धा (विश्वास) ठेवण्याच्या अटीनंतर इस्लाम सर्वांत जास्त ज्या पैलूवर भर देतो तो आहे जकात, अर्थात आपल्या संपत्तीपैकी एक भाग काढून त्याने आपल्या निर्बल बंधुंना मदत करणे. येथे ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की, लोकांनी आपल्या स्वत:च्या प्राप्ती व संपत्तीतून इतरांसाठी खर्च करावे, याची शिकवण कम्युनिझम देत नाही. परंतु इस्लाम अशा प्रकारचा खर्च अवश्य करण्याची ताकीद देतो. जर एखाद्याने असा खर्च केला नाही, मग तो मुस्लिम का असेना, तर इस्लामची तलवार त्याच्याविरुद्ध अवश्य उठेल.

म्हणून इस्लाम कम्युनिझमपेक्षा अधिक चांगला व श्रेष्ठतर आहे.

सामान्यत: भांडवलदाराच्या मनात ही गोष्ट असते की, त्याची संपत्ती त्याच्या आराम व शांतीसाठी आहे, ती दुसऱ्यासाठी खर्च करणे म्हणजे निर्धनतेला आमंत्रण देणे होय. हीच शंका सामान्यपणे लोकांना सतावते.

इस्लाम सर्वप्रथम या शंकेला मुळासकट उखडून टाकतो. दिव्य कुरआन उघड उघड म्हणतो की, दुसऱ्यासाठी खर्च केल्याने निर्धनता नव्हे तर संपन्नता येते.

"सैतान तुम्हाला निर्धनतेचे भय दाखवितो आणि लज्जास्पद नीती (कंजूषपणा) अवलंबिण्याची प्रेरणा देतो, परंतु अल्लाह तुम्हाला आपल्याकडून कृपेचे आश्वासन देतो. अल्लाह फार ऐकणारा व जाणणारा आहे." *(दिव्य कुरआन, २ : २६८)*

कंजूषपणा म्हणजे काय? आपल्या गरजा, आपल्या मुलाबाळांच्या गरजा व अन्य लोकांच्या गरजा पूर्ण करण्यासाठी खर्च करण्याऐवजी पैशाला पैसा जोडून ठेवण्याच्या वृत्तीस कंजूषपणा म्हणतात.

तामिळ चित्रपट जगतात एक प्रसिद्ध गायक होते. ते फार कंजूष होते. त्यांच्या मुलाच्या पायाला जखम झाली. त्याच्या उपचारासाठी खर्च करण्याससुद्धा ते टाळाटाळ करीत राहिले. परिणाम असा झाला की, मुलाचा अंत झाला. कंजूषपणाचा हा परिणाम आहे. अशा प्रकारच्या कंजूषपणा व काटकसरीला इस्लामचा सक्त विरोध आहे.

इस्लामने केवळ खर्च करण्याचीच शिकवण दिली नाही, तर याचबरोबर खर्च करण्याच्या पद्धतीसुद्धा शिकविल्या आहेत. काही लोक खर्च तर करतात, परंतु त्यांचा उद्देश उपकाराची जाणीव देणे व प्रसिद्धी प्राप्त करणे असते. या व अशा प्रकारच्या अन्य प्रेरकांना इस्लाम अयोग्य ठरवितो आणि त्यांना समाप्त करतो. तो म्हणतो की, खर्च एक धार्मिक कर्तव्य आहे व नमाजनंतर इस्लामचा दुसरा मोठा स्तंभ आहे. अल्लाहच्या प्रसन्नतेशिवाय तुमचा खर्च करण्याचा काही अन्य उद्देश असता कामा नये, हीच दिव्य कुरआनची ताकीद आहे.

मी काही शहरात पाहिले की, एखाद्या व्यक्तीने एखाद्या संस्थेला ट्यूब लाइटचे दान केले आणि त्यावर देणाऱ्याचे नाव अशा तऱ्हेने लिहिले गेले की, प्रकाश बाहेर येऊ शकला नाही. इस्लाम म्हणतो की, अशा प्रकारचा खर्च व अशा प्रकारचे दान केवळ चुकीचेच नव्हे तर सर्व पुण्यांना नष्ट करणारे आहे. काही लोक दुसऱ्यांना आर्थिक सहाय्य अथवा अन्य मदत तर करतात, परंतु आपल्या उपकाराचा इतका दबाव मदत घेणाऱ्यावर घालतात की, त्याचे हृदय दुःखित होते. अशा सर्व कृतींना इस्लाम निषिद्ध मानतो. दिव्य कुरआनमध्ये आहे -

"एक मधूर वचन व (एखाद्या अप्रिय गोष्टीवर) क्षमा करणे त्या दानापेक्षा श्रेष्ठतर आहे, ज्याच्या पाठीमागे दुःख असेल." *(दिव्य कुरआन, २ : २६३)*

विनोबा भावे यांचे जेव्हा भूदान आंदोलन सुरु होते तेव्हा काही लोक चांगली जमीनसुद्धा दान म्हणून देत होते, परंतु बरेचसे लोक पडीक व खडकाळ जमीन देत होते.

आपल्या घरातील फाटके-तुटके जुने कपडे, शिळे अन्न, तुटके-फुटके सामान देणारे 'दानी' लोकसुद्धा जगात आढळतात. फाटक्या नोटा व खोटी नाणी दान करणारे लोक जगात आढळतील. परंतु इस्लाम आपल्याजवळील उत्तम वस्तू दानात देण्याची शिकवण देतो. आपल्या आवडीचे पोषाख, आपले आवडते अन्नपदार्थ, आपली आवडती संपत्ती या सर्वांना अल्लाहच्या मार्गात खर्च करावयाची ताकीद देतो. आपल्या कमाईतील ज्या अत्युत्तम वस्तू आहेत, त्यांना अल्लाहच्या मार्गात खर्च करावे, ही आहे

इस्लामची शिकवण, दिव्य कुरआनमध्ये आहे-

''आपण दुसऱ्यांना अन्न, वस्त्र किंवा आर्थिक सहाय्य जे काही देता इस्लाम ते लपवून देण्यास श्रेष्ठ मानतो.''

तथापि जरूरी असेल तर उघडरीत्यासुद्धा मदत दिली जाऊ शकते. दिव्य कुरआनमध्ये आहे-

''जर तुम्ही आपले दान जाहीर करून दिले तरी हे चांगले आहे, परंतु लपवून गरजूंना दिले तर ही गोष्ट तुमच्यासाठी अधिक चांगली आहे.''

*(दिव्य कुरआन, २ : २७१)*

दान व खर्चासंबंधी एक बाजू अशीसुद्धा आहे की, एखादा धन-उधळ्या व दारुड्या आपल्याकडे मदत मागण्यास आला तर आपण त्याला मदत कराल का? जर केलीच तर ती मदत कशा प्रकारची असेल? इस्लामने या प्रश्नांचे उत्तरसुद्धा दिले आहे. कार्यभ्रष्ट व बुद्धिहीन लोकांच्या हातात रक्कम दिली जाऊ नये, अशी इस्लामची शिकवण आहे. तरीसुद्धा त्यांच्या अन्न, वस्त्र वगैरेची व्यवस्था केली जावी. दिव्य कुरआनमध्ये आहे -

''आणि तुमचा तो माल (संपत्ती) ज्याला अल्लाहने तुमच्यासाठी जीवन टिकविण्याचे साधन बनविले आहे, त्याला मूर्ख लोकांच्या हवाली करू नका. होय, त्यांना जेवण-खान द्या आणि त्यांना चांगला उपदेश करा.''(दिव्य कुरआन, ४ : ५)

त्यांच्या मौलिक गरजामध्ये अन्न-वस्त्राच्या काळजीनंतर इस्लाम या बाबतीत जो आदेश देतो त्यावर एक साधारण दृष्टी टाकू -

- तुमचा व तुमच्या मुलाबाळांवर होणारा खर्च करून जे काही उरेल त्यातून अल्लाहच्या मार्गात खर्च करा.
- आपल्या शक्तीपेक्षा अधिक खर्च करू नका आणि कंजूषपणादेखील करू नका. तुमची नीती संतुलित असावी.
- असे करू नका की, खर्चाकडून तुम्ही आपला हात पूर्णपणे ओढून घ्यावा. त्याचबरोबर आपल्या हाताला इतके सुटे सोडू नका की, ज्यामुळे तुम्ही स्वतः मदत मागण्यास योग्य बनावे.
- तुमचे आपले निर्धन नातेवाईक, मोताद, दरिद्री, अनाथ आणि प्रवासी तुमच्या मदतीचे हक्कदार आहेत.

आपल्या संपत्तीची जकात देणे मुस्लिमांसाठी अनिवार्य आहे. हे कर्तव्य पूर्ण करण्यात गफलत करणाऱ्या व बेपर्वाई करणाऱ्यासाठी सक्त ताकीद दिली गेली आहे. एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एका स्त्रीजवळ सोन्याचे कडे पाहिले. पैगंबरांनी तिला

विचारले की, ''तुम्ही यांची जकात देता?'' ती महिला उत्तरली, ''नाही''. तेव्हा पैगंबर म्हणाले की, 'परलोकात तुम्हाला अग्नीचे कडे घातले जातील.' (महिलेने ते कडे दान करून टाकले.)

जकातची रक्कम कोणत्या लोकांसाठी खर्च केली जाऊ शकते? दिव्य कुरआनने ते स्पष्ट केले आहे. गरीब, मोताद, कर्जदार, अनाथ आणि प्रवाशांना दानाव्यतिरिक्त जकातची रक्कम मन राखण्यासाठी खर्च केली जाऊ शकते. अशाच प्रकारे गुलामांना मुक्त करण्यासाठीसुद्धा जकातपैकी रक्कम खर्च केली जाऊ शकते. तसेच कैद्यांना कैदेतून मुक्त करण्यासाठी जकातची रक्कम उपयोगात आणली जाऊ शकते. या शिवाय जे लोक जकातच्या वसुलीसाठी नेमलेले असतील त्यांचा पगारसुद्धा जकातमधून दिला जाऊ शकतो. जकात खर्च करण्याच्या ठिकाणात एक 'अल्लाहचा मार्ग'सुद्धा आहे. अर्थ व उद्देशाच्या दृष्टीने 'अल्लाहचा मार्ग' या शब्दांची फार व्यापक व्याख्या आहे. कल्याणाची सर्व कामे अल्लाहच्या मार्गांतर्गत येतात. विशेषत: धर्माचा प्रचार व प्रसार करण्याचा प्रयत्न वगैरे अल्लाहच्या मार्गांतर्गतच मोडतात.

आई-वडील व संतती वगैरे ज्यांची जबाबदारी आपणावर असते, त्यांच्यासाठी जकातची रक्कम खर्च केली जाऊ शकत नाही. संपत्तीतील हा वाटा तर दुसऱ्यासाठीच देण्याचा आदेश दिला गेला आहे.

आता इस्लामी शिकवणीचा एक अन्य पैलू घ्या. यथासंभव मागण्यापासून व दुसऱ्यासमोर हात पसरण्यापासून स्वत:ला वाचविण्यासाठी इस्लामने ताकीद दिली आहे. माणसाने असा प्रयत्न केला पाहिजे की, त्याने दाता बनावे, याचक नव्हे. एखाद्यासमोर हात पसरण्यापेक्षा हे अधिक श्रेयस्कर आहे की, त्याने लाकूड तोडावे व त्यावर आपला उदरनिर्वाह करावा, असे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कथन आहे.

एकदा एका खेडुताला पैगंबर मुहम्मद (स.) यांनी बोलाविले आणि त्याच्या हाताचे चुंबन घेतले. त्याच्या हातावर कष्ट व परिश्रमाच्या खुणा होत्या. तो आपला व आपल्या कुटुंबाचा उदरनिर्वाह करण्यासाठी मेहनत-मजुरी करीत असे, म्हणून प्रसन्न होऊन पैगंबरांनी त्याच्या हाताचे चुंबन घेतले.

एकीकडे इस्लामने याचना करण्यास व मागण्यापासून रोखले आहे, तर दुसरीकडे प्रसन्नचित्ताने दुसऱ्यासाठी संपत्ती खर्च करण्याची आज्ञा दिली आहे. यावरून हा निष्कर्ष काढला जाऊ शकतो की, इस्लामच्या शिकवणीत अत्यंत सौंदर्य व संतुलन आढळते.

# काही स्पष्टीकरण

'इस्लाम ज्यावर माझे प्रेम आहे' हे पुस्तक वाचून काही सज्जनांनी अडियार यांना इस्लामसंबंधी काही प्रश्न केले आणि काही शंका व्यक्त केल्या. आम्ही येथे ते प्रश्न आणि शंका व त्यांची उत्तरे वाचकांच्या माहितीसाठी प्रस्तुत करीत आहोत.

## मुस्लिम देशांची आपसातील भांडणे व इस्लाम

एका मुस्लिमेतर बंधुने प्रश्न केला की, आज आम्ही पाहतो की, मुस्लिम देश आपापसात भांडत आहेत. वास्तविकत: ते सर्व इस्लामला मानणारे आहेत. मग इस्लावर प्रेम असण्याचा काय अर्थ आहे?

याच्या उत्तरादाखल अडियार म्हणाले, "जेथपर्यंत मला कळते प्रेम तर प्रेमच आहे. मुस्लिम काय करतात याच्याशी त्याचा काहीही संबंध नाही. मुस्लिमांच्या उणिवा व दोषांना पाहून मी इस्लामची प्रशंसा केल्यावाचून राहू शकत नाही."

परंतु एका सज्जनाने विचारले - अरब देशांनी एक दुसऱ्यांशी युद्ध केल्याने इस्लामवरील विश्वास उडत नाही काय?

अडियार म्हणाले, "बाह्यत: या प्रश्नात वजन असल्याचे दिसते, परंतु सत्य काही वेगळेच आहे. विश्वास उडण्यासाठी काही मजबूत व भरीव आधार असणे आवश्यक आहे. आम्ही पाहतो की, चीन व व्हिएटनाम दोन्ही कम्युनिस्ट देश लाल झेंड्याचे ध्वजवाहक आहेत. तरीसुद्धा दोघांदरम्यान युद्ध झाले. मग भारतातील कम्युनिस्ट असे म्हणतात की, आमचा कम्युनिझमवरील विश्वास उडाला आहे काय? असे ते कदापि म्हणणार नाहीत. अशाच प्रकारे आम्ही पाहतो की, हिटलर व चर्चिल दोन्ही ख्रिश्चन होते. दोघांच्या नेतृत्वात जर्मनी व इंग्लंडदरम्यान तुंबळ युद्ध झाले. मग या युद्धाने ख्रिश्चनांच्या मनातून त्यांचा विश्वास हिरावून घेतला काय आणि त्यांनी ख्रिस्ती धर्माकडून आपले तोंड फिरविले काय? अजिबात नाही आणि पाहा, भारताच्या विभिन्न मंदिरांत पुन्हा पुन्हा भांडणे झाली, मग त्यामुळे मंदिराचे पुजारी ईश्वराला कंटाळून नास्तिक व अनेकेश्वरवादी झाले काय? बिल्कुल नाही." मग जर या गोष्टी खऱ्या आहेत तर मुस्लिम देशांच्या केवळ आपसातील संघर्षामुळे इस्लामशी असमाधानाचा प्रश्न उठतो तरी कोठे?

"हे तर विभिन्न देशांमधील संघर्ष आहेत ज्यांचा श्रद्धा व धर्माशी काडीमात्र संबंध नाही. हे संघर्ष आज ना उद्या संपुष्टात येऊ शकतील, परंतु श्रद्धा व विश्वास आजही आहे व उद्यासुद्धा बाकी राहील. ही बदलणारी अथवा डळमळीत होणारी गोष्ट नव्हे."

आज जगात कम्युनिझमला एका शक्तीचा दर्जा आहे आणि त्याच्याविरुद्ध

भांडवलशाहीची एक दुसरी शक्ती आहे. तिसरी शक्ती जर कोणती असेल तर ती इस्लामची आहे.

वरील पहिल्या दोन्ही शक्ती सरतेशेवटी तिसऱ्या शक्तीसमोर नतमस्तक होतील. इतिहासाचा अभ्यास हेच दर्शवितो. भूतकाळाचा इतिहास, वर्तमानकालीन इतिहास आणि भविष्यकाळाचा इतिहाससुद्धा सर्वच इस्लामकडे संकेत करतात.

हे सर्वच इस्लामी देश निर्धन होते. परंतु ''अरबस्तानाच्या वाळवंटातून जगात कृपाप्रसाद पसरेल,'' अशी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी घोषणा केली होती. आम्ही पाहतो की, आज तेथील दगडातून पेट्रोल उसळत आहे.

जर अरब लोक इस्लामी श्रद्धावर आणखी अधिक विश्वास व कृती करतील तर त्यांच्यावर अल्लाहची कृपा जगातसुद्धा फार अधिक होईल.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवन निष्कलंक होते. अशाच प्रकारे खलीफांचे जीवनसुद्धा निर्दोष होते. इतिहासाच्या नंतरच्या काळात काही नवाब व बादशाहचे पाय पसरले आहेत. त्यांच्याकडून काही चुका घडल्या आहेत, परंतु मुस्लिम समाजाचा धर्म व आपल्या तत्त्वावर अढळ विश्वास राहिलेला आहे. प्रारंभिक काळात त्यांची संख्या लाखात होती, तर आज ही संख्या कोट्यवधीत पोचली आहे. यावरून स्पष्ट होते की, मुस्लिम देशांच्या उणिवा व चुकांमुळे श्रद्धा डळमळण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही. लोकांच्या चुकांमुळे तत्त्वे चुकीची ठरत नाहीत.

वास्तविकता अशी आहे की, जगातील गंभीर प्रश्नांची सोडवणूक व जगातील संकटांचा उपाय इस्लामच आहे. सूर्य जर मंद पडला तर प्रकाश कोठून येईल? समुद्राने जर खारटपणा हरवला तर मीठ कोठून येईल? स्त्रोतच जर सुकून गेले तर पाण्याची धार कोठून येईल? इस्लाम जर पराजित झाला तर जग व मानवजातीला आपल्या दुःखांचा उपाय कोठून मिळेल?

## इस्लाममध्ये 'शिक्षा'

सामान्यपणे मुस्लिमेतर बंधुत ही गोष्ट प्रसिद्ध आहे आणि ती खूप पसरविलीसुद्धा गेलेली आहे की, मुस्लिम निर्दयी असतात आणि त्यांच्यात शिक्षासुद्धा क्रूरपणे दिल्या जातात. असेही सांगितले जाते की, मुस्लिमांनी चढाया करून मंदिरे पाडली आणि जुलूम व अत्याचार केले. याच सर्व गोष्टींना घेऊन असे म्हटले जाते की, मुस्लिम जुलमी व निर्दयी असतात.

हे आरोप करण्यापूर्वी लोकांनी आत्मपरीक्षणसुद्धा केले पाहिजे. मग खरी हकिकत स्पष्ट होऊन समोर येऊ शकते.

- पुत्राने वासराला ठार केले म्हणून मनुस्मृतीच्या आदेशाप्रमाणे चोलानने आपल्या मुलाला फाशी दिली. या कृतीला काय म्हणावे?
- राजाच्या बागेतील एक फळ नदीत पडले व वाहत आले. ते एका मुलीने पाहिले व ते फळ खाल्ले. नन्नन (Nunnen) नामक राजाने या अपराधासाठी त्या मुलीला ठार करण्याची शिक्षा दिली.
- प्रसिद्ध कवि कंगीच्या पायातील कडे एका सोनाराने चोरले तेव्हा तत्कालीन सर्व सोनारांना ठार केले गेले.
- ज्ञाना समुंदर नामक गुरु एका मठात राहत असत. समनर नामक जातीच्या लोकांनी त्या मठाला आग लावण्याचा प्रयत्न केला. या अपराधासाठी त्या जातीच्या आठ हजार लोकांना फासावर देण्यात आले.
- अय्यर नावाच्या एका व्यक्तीला धर्म बदलण्याच्या अपराधासाठी त्याच्यावर दगड बांधून समुद्रात फेकून दिले गेले. परंतु तो वाचला तेव्हा त्याला चुन्याच्या भट्टीत घातले गेले.
- तेनाली रामनच्या अनेक घटनांपैकी एक घटना अशीसुद्धा आहे की, राजाची आज्ञा न मानणाऱ्याला जिवंत गाडले गेले आणि काहींना हत्तीच्या पायाखाली तुडविले गेले.
- तामिळनाडूच्या तिरुमलाई व म्हैसूरच्या राजांदरम्यान जी लढाई झाली, त्यात लोकांचे नाक कापले गेले. म्हैसूरच्या राजाने तामिळनाडूवर सूड उगविण्यासाठीच हल्ला केला होता व लोकांचे ओठ व नाक कापले होते. त्यानंतर त्याने आपल्या शत्रूंचे नाक व ओठ कापले. (नायक राजांच्या इतिहासाच्या पुस्तकावरून घेतले गेले)
- बालकांचा बळी देणे, मानवी अवयव अर्पण करणे, ही रूढी आजसुद्धा आमच्या देशात अनेक ठिकाणी प्रचलित आहे. मग ही दया व कणवाळूपणाची कृत्ये आहेत काय?
- पाश्चिमात्य जगतात सुळावर चढविणे ही एक सामान्य गोष्ट होती. आदरणीय ईसा मसीह (अ.) (येशू ख्रिस्त) यांना सुळावर चढविण्याचा प्रयत्न केला गेला. सेंट पीटरला उलट लोंबकळत ठेवून सुळावर चढविले गेले.
- जोन ऑफ ऑर्कला जिवंत जाळले गेले.
- ऑटेस्टन्ट मतावलंबियांची डोकी फोडून त्यांच्या मेंदूना छिन्नविच्छिन्न केले गेले आणि त्यांना जिंवत जाळले गेले.
- गुराढोरांप्रमाणे माणसांना आफ्रिकेतून पकडून आणले गेले आणि युरोपच्या बाजारात

गुलाम म्हणून त्यांचा लिलाव केला गेला, अशी होती पाश्चिमात्य सभ्यता.

- हिटलरने गॅस चेंबरमध्ये अनेक लोकांना ठार केले.
- आजसुद्धा भारताच्या विभिन्न भागांतून अशा बातम्या येतात की, जातीय दंगल झाली व दंगलीत लोकांना जिवंत जाळले गेले. वलीपुरम, जमशेदपूर आणि भेलसाच्या घटना याच्या साक्षी आहेत.

अशा प्रकारे जगातील प्रत्येक देशाचा इतिहास जुलूम व अत्याचाराच्या गोष्टींनी डागाळलेला दिसतो. विभिन्न तत्त्वज्ञानाच्या आधारे मानवाने जुलूम व अत्याचाराला वैध मानले आहे. तसेच त्याच्याकडून दया व दानशूरतासुद्धा दाखविली गेली आहे. क्रूर व हिंसक विचार नष्ट करून त्याच्या जागी खऱ्या अर्थाने दयेची शिकवण जर एखाद्या खऱ्या धर्माने दिली असेल तर तो इस्लाम आहे.

काही धर्मांत ईश्वराच्या गुणांना विभाजित करून प्रत्येक गुणाचा एक वेगळा ईश्वर मानला जातो. काही धर्म तर असे आहेत, ज्यात ईश्वराला निर्गुण मानले जाते. परंतु इस्लाममध्ये ईश्वर सर्वथा दया असल्याचे दिसते. खुद्द पैगंबर मुहम्मद (स.) यांचे आगमनच मुळी दया असल्याचे म्हटले गेले आहे. दिव्य कुरआनमध्ये अल्लाहला जागोजागी दयावान व कृपाशील म्हटले गेले आहे. अल्लाहला हे पसंत आहे की, त्याचे गुण, दया व कृपेची छाप त्याच्या दासांच्या जीवनातसुद्धा दिसावी.

इस्लामची शिकवण आहे की, प्रत्येक कार्य अल्लाह दयावान, कृपाशीलच्या नावाने सुरू केले जावे. इस्लामने सलाम करण्याची जी पद्धत शिकविली आहे, त्यावरूनसुद्धा दया व कृपाच प्रकट होते. वास्तविकत: मुस्लिम दुसऱ्यासाठी दयावान, कृपाशील आणि प्रेमळ असतो. दिव्य कुरआनची शिकवण हीच आहे आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांचा आदर्शसुद्धा हाच आहे. जर काही लोकांनी हा कृपाशीलतेचा मार्ग सोडला तर इस्लाम त्यांना या मार्गावर पुन्हा येण्याची ताकीद करतो.

तुर्कस्तानचे एक शासक सुलतान सलीम होते. ते आपल्या अधीन असलेल्या लोकांशी अत्यंत कठोरतेचा व्यवहार करीत असत. ते आपल्या देशातील सर्व भाषा व सर्व धर्म नष्ट करून एकच भाषा व एकच धर्म प्रचलित करू इच्छित होते. परंतु त्या वेळच्या इस्लामी विद्वानांच्या घोर विरोधामुळे सुलतानला आपली ही योजना गुंडाळावी लागली.

मनोरंजनासाठी जनावरांना व पक्ष्यांना आपापसात लढविण्याचा रिवाज विभिन्न देशांत आजसुद्धा आढळतो. इस्लामने याला अत्यंत निंदित कृत्य ठरविले आहे.

अदी बिन हातिमने मुंग्यांना अन्न पोचविले. हा इस्लामी शिकवणीचा परिणाम

होता. सडकेवर चालण्याचा अधिकार जनावरांचासुद्धा आहे, त्यांना हटविले जाऊ शकत नाही. शीराजीने ही घोषणा केली. अशा प्रकारच्या घटना मुस्लिमांच्या इतिहासात सापडतात.

उंटावर जर तीन व्यक्ती बसले असतील व उंट ओझ्याने दाबला जात असेल तर एकाला सक्तीने खाली उतरवा. ही शिकवणसुद्धा इस्लामची आहे.

हे सत्य आहे की, दयेची शिकवण देणारा इस्लाम भयंकर अपराधासाठी गुन्हेगारांना कठोर शिक्षा देण्याचा आदेश देतो. निस्संदेह इस्लामने चोराचे हात कापण्याचा आदेश दिला आहे, परंतु याच्या परिणाम व प्रभावालासुद्धा पाहणे आवश्यक आहे. ज्या मुस्लिम देशात हा कायदा प्रचलित आहे तेथे चोरीच्या घटना नगण्य झाल्या आहेत.

अरब देशात खुन्याचे शिर तलवारीने उडविले जाते, परंतु अन्य देशांत खून करणाऱ्याला फाशी अथवा विजेने मोठ्या त्रासाने जीव जातो. म्हणून तलवारीने डोके उडविण्याची शिक्षा देण्यालाच अधिक चांगले मानले जाईल.

## मुस्लिमांनी मंदिरे पाडली काय?

अशाच प्रकारचा एक निराधार आरोप असा आहे की, मुस्लिमांनी भारतातील मंदिरांचा विध्वंस केला.

असले आरोप लावताना आम्ही हे विसरून जातो की, अशा प्रकारची कृत्ये खुद्द भारतात दुसऱ्या लोकांनीसुद्धा केली आहेत. आमच्या येथील समनर पंथाची मंदिरे पाडली गेली. आम्हाला याचेसुद्धा विस्मरण झाले की, नाटा टीनमच्या मूर्ती लुटल्या गेल्या आणि तेथे जे सोने होते ते तिरुमगई निवासी आशावार उचलून घेऊन गेले.

आम्ही असे तर म्हणतो की, मुस्लिमांनी मंदिरे पाडली, परंतु आम्ही हे विसरून जातो की, त्यांनी हिंदू मंदिराना जमिनी दान केल्या. मुस्लिमांनी जर काही मंदिरे पाडली आहेत, तर त्याची कारणे काही वेगळीच असतील. इस्लामची ही शिकवण नाही की, दुसऱ्यांच्या उपासनास्थळांना नष्ट करावे अथवा त्यांचा विध्वंस करावा.

एका सज्जनाने जेव्हा असे विचारले की, भारताच्या इतिहासावरून असे कळते की, मुस्लिमांनी मंदिरे पाडली व मूर्ती भग्न केल्या, याविषयी आपले काय म्हणणे आहे? यावर अडियार उत्तरले -

वस्तुस्थिती अशी आहे की, भारताचा इतिहास जो लोकांच्या हातात आहे तो काही खरा आणि संशोधनाच्या प्रकाशात लिहिला गेलेला नाही. मुस्लिम व अन्य धर्मियांच्या दरम्यान शत्रुत्व उत्पन्न करण्याच्या उद्देशाने पाश्चिमात्य उपद्रवींनी हा इतिहास लिहिला आहे. जर ही गोष्ट सिद्धसुद्धा झाली की, मुस्लिमांनी मंदिरे पाडली आणि मूर्ती

तोडल्या, तरी माझे उत्तर असेच राहील की, इस्लाममध्ये अन्य धर्मियांचे मंदिर पाडणे अथवा ते तोडण्याची परवानगी दिल्याचे अजिबात आढळत नाही. हे कृत्य करणारे मग महमूद गजनवी असो की, त्यांची फौज, याचा इस्लामशी काडीमात्र संबंध नाही. उलट इस्लामी राज्य तर मुस्लिमेतरांच्या पूजास्थळांचे रक्षण करण्यास जबाबदार आहे.

मूर्तीची पूजा करणे चुकीचे आहे. लोकांत ही चेतना इस्लाम निर्माण करतो आणि याच्यासाठी तो स्पष्ट प्रमाण प्रस्तुत करतो. धर्माच्या संबंधाने कसलीही बळजबरी नाही. ही घोषणा इस्लामने स्पष्ट शब्दांत केली आहे. इस्लामला वाटते की, लोकांच्या हृदयाची दुनिया अनेकेश्वरत्व व नास्तिकतेपासून मुक्त व्हावी व त्यात सत्याचा प्रकाश पसरावा. यासाठी तो प्रचार व आमंत्रणाचा मार्ग अवलंबितो. बळजबरीची नीती त्याच्या स्वभावाच्या अगदी विरुद्ध आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी काबागृहाला मूर्तीपासून शुद्ध केले. हे एक ऐतिहासिक सत्य आहे. परंतु येथे ही गोष्ट विसरता कामा नये की, काबाचे स्थान अल्लाहच्या घराचे आहे. त्याला मूर्तीगृह तर लोकांनी आपल्या अज्ञान व उद्दामपणाने बनविले होते. (काबा तर केवळ अल्लाहच्या उपासनेसाठीच बनविले गेले होते. ही गोष्ट तर अरबस्तानातील मूर्तीपूजकसुद्धा मान्य करीत असत. नंतरच्या काळात अल्लाहच्या या घरात अनेक मूर्ती आणून ठेवल्या गेल्या, जे पूर्णपणे चुकीचे कृत्य होते. त्याच मूर्तींना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी काबागृहातून हटविले आणि त्याला पूर्वीप्रमाणे केवळ अल्लाहचे उपासनास्थान बनविले.)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ख्रिश्चन व यहूदी (ज्यू) यांच्या एखाद्या प्रार्थनास्थळाला पाडले असावे, याचे कोणीही एखादे उदाहरण प्रस्तुत करू शकणार नाही.

## इस्लामचा प्रचार व तलवार

एक प्रश्न असा केला गेला आहे की, इस्लाम तलवारीच्या बळावर पसरलेला आहे, तो आपल्या स्वतःच्या सद्गुणामुळे जगात पसरलेला नाही.

हा केवळ एक असा आरोप आहे ज्याच्या पाठीमागे कोणताही पुरावा नाही. दिव्य कुरआनने तर स्पष्ट शब्दांत बळजबरीचा प्रयोग करण्यापासून रोखले आहे.

इस्लामवर आक्षेप घेणारे लोक जगाचा इतिहास विसरून जातात. त्यांचे तोंड उघडले तर इस्लामच्या विरुद्ध आणि निराधार आरोप करण्याचे कर्तव्य बजावले जाऊ लागते. जगाच्या इतिहासावर दृष्टी टाकल्यास तुम्हास कळेल की, अनेक शासनांनी आपल्या मताचा व धर्माचा शक्तीच्या बळावर प्रसार केला आहे. लांब कशाला जावे, भारताचाच इतिहास घ्या. भारतात अशोक व हर्ष यांच्या शासनाच्या सहाय्याने बुद्धमताचा

प्रसार झाला. समनर पंथाचासुद्धा हाच इतिहास आहे. एक काळ असा होता की, जेव्हा भारताचे सर्वच राजे-महाराजे समनर पंथीय होते आणि भारतावर याच मताची व पंथाची छाप होती. यानंतर वैदिक धर्माचा (हिंदूमताचा) काळ आला. या धर्माने शासनाच्या शक्तीच्या आधारे दुसऱ्या धर्मियांना समाप्त केले आणि याच संबंधाने त्यांना सुळावर चढविले. ही आहे ती पद्धत जिचा अवलंब करून भारताला एक हिंदू राष्ट्र बनविण्याचा प्रयत्न केला गेला.

त्याशिवाय भारतीय शासकांनी चढाया करून दुसऱ्या देशातसुद्धा आपल्या धर्माचा प्रसार केला. जावा, सुमात्रा, कंबोडिया वगैरे देशांत आजसुद्धा हिंदू धर्माची चिन्हे व मूर्ती आढळतात. ख्रिश्चन धर्माचा अवलंब करणाऱ्या शासकांनी जेव्हा अन्य देशांवर चढाई केली, तेव्हा तेथे त्यांनी ख्रिश्चन धर्माचा प्रसार करण्याचा प्रयत्न केला.

आता जर हे सिद्धदेखील झाले की, काही मुस्लिम शासकांनी इस्लामच्या प्रचारासाठी आपल्या प्रभावाचादेखील प्रयोग केला तर ही काही निराळी चूक नाही की, जिच्या आधारे इस्लामला बदनाम करण्याचा प्रयत्न केला जावा. आजच्या ज्ञानाच्या काळातसुद्धा पुन्हा पुन्हा हा आरोप लावला जातो की, इस्लामचा आपल्या शक्तीने नव्हे तर तलवारीच्या शक्तीने प्रसार झाला आहे. आश्चर्य तर या गोष्टीवर आहे की, हा आरोप लावणाऱ्या लोकांत असले सत्ताधारी लोकसुद्धा दिसतात, ज्यांची परिस्थिती अशी आहे की, ते बंदुकीच्या आधारे आपले सिद्धान्त व मताचा प्रसार करण्याचा घृणित प्रयास करतात. परंतु त्यांची दृष्टी स्वतःवर जात नाही.

आजच्या युगात धर्मासंबंधी बळजबरीचा प्रश्न उद्भवत नाही. होय, आपल्या विचारसरणीवर टिकून राहणे व ती दुसऱ्यांपर्यंत पोचविण्याचा अधिकार प्रत्येकाला आहे. आजच्या युगातसुद्धा इस्लामचा स्वीकार करणाऱ्याची संख्या काही कमी नाही. अखेर त्यांना कोणत्या तलवारीद्वारे हे करण्यास भाग पाडले असेल? ती काही पोलादी तलवार नाही तर ते सत्याचे आकर्षण आहे जे लोकांना आपल्याकडे आकर्षित करीत असते.

- समाप्त -